# वा म कु क्षी

( कथासंग्रह )

ले ख क

प्र. के. अत्रे

किंमत तीन रुपये

# अनुक्रमणिका

# पाठीवरचे वळ

१

मध्यवर्ति कायदेमंडळाच्या निवडणुकी महिना पंधरा दिवसांवर येऊन ठेपलेल्या होत्या. निरनिराळ्या राजकीय पक्षाचे प्रचार अगदीं जोरांत चाललेले होते. लोकांचीं मनें हळूहळू प्रक्षुब्ध होऊं लागलीं होतीं. राजकारणाखेरीज दुसरा विषय ऐकूं येत नव्हता. कोठेंही जा; खानावळींत जा, हॉटेलांत जा, ट्रॅममध्यें बसा, किंवा चौपाटीवर फिरावयाला जा. तीच ती भाषा, तेंच बोलणें आणि तोच तो वाद. देशमुखांना जास्ती मतें मिळतील कां मसानींना ? ढमढेऱ्याचें डिपॉझिट खरोखरच जप्त होईल किंवा नाहीं ? जीना निवडून येणार का हुसेनभाई लालजी ?

आमच्या खानावळींत भिडे आणि भोसले नांवाचे दोन मेंबर होते. भिडे गायवाडींत राहत होता आणि भोसले फणसवाडींत राहत होता. भिडे पक्का हिंदुमहासभावादी, तर भोसले कट्टर कॉंग्रेसवाला ! त्या दोघांनीं भांडून भांडून तर सारी खाणावळ डोक्यावर घेतली. त्यांचा वाद सुरू झाला कीं बाकीच्या मेंबर

लोकांना जेवण सुचत नसे. खाणावळीच्या मालकांच्या तें चागलेच पथ्यावर पडलें! कारण, या भांडाभांडीमुळें रोज लोक कमी जेवूं लागले, अन्नाचा खर्च कमी होऊं लागला आणि त्यामुळे त्यांचा चांगला फायदाच झाला. एके दिवशीं या भिड्यानें आणि भोसल्यानें साऱ्या मेंबराना साक्षी ठेवून खरकट्या हातानी एक विलक्षणच पैज मारली. भिडे म्हणाला, "अण्णा-साहेब भोपटकर जर निवडून आले नाहीत, तर जन्मांत मी लग्नच करणार नाही. अस्सा ब्रह्मचारी राहीन!" त्यावर भोसले म्हणाला, "भोपटकर जर निवडून आले तर मी माझी बायको जन्मभर टाकून देईन, कध्धीं तिला माहेराहून इथें घेऊन येणार नाहीं!" वास्तविक या निवडणुकीमध्यें भिड्यालाही मत नव्हतें आणि भोसल्यालाही मत नव्हते. त्या दृष्टीनें दोघांचाहि निवडणुकीशीं कांहीच संबंध नव्हता. पण निवडणुकीच्या विचारानें त्यांच्यासारख्या उपऱ्यांचींहि डोकीं अशीं फिरून गेलीं होतीं कीं कांहीं विचारूं नका. साऱ्या वातावरणांत मिरच्याच्या भुकटीप्रमाणें राजकारण नुसतें उधळून राहिलें होतें.



पुण्याला माझा एक मित्र आजारी होता, म्हणून एके दिवशीं मी घाईघाईनें संध्याकाळच्या मेलनें पुण्याला जायला निघालों. तिसऱ्या वर्गात उतारूंची अशी कांहीं खेचाखेच झाली होती कीं कांहीं विचारूं नका. कशी तरी मी एका कोंपऱ्यांत जागा मिळ-विली. गाडी सुरू होऊन डब्यांतल्या माणसांना आपलीं बुडें स्थिर झालीं आहेत, असें कुठें वाटूं लागलें नाहीं तोंच, चार

हातांवर पलीकडे एक जोराचें राजकीय भांडण सुरू झालें. डोक्याला भगवी टोपी घातलेला एक हिंदुमहासभावादी दाटीवाटीनें शेजारीं बसलेल्या मुसलमानाच्या अंगावर एकदम खेंकसला, " पाय खालीं ठेवा, मघापासून चार वेळां तुमचा बूट लागला मला ! दिसतं आहे कीं नाहीं ? बघता काय डोळे वटारून माझ्याकडे ? माज कसला चढलाय तुम्हाला ? मी पांढरी टोपी घालणारा गुजराती गांधीभगत नाहीं ! मी शिवाजीमहाराजांच्या महाराष्ट्रांतला चित्तपावन ब्राह्मण आहें हिंदुमहासभावादी ! त्या कॉंग्रेसवाल्यांनीं तुम्हाला डोक्यावर चढवून बसविले तसें मी बसविणार नाहीं. सोट्याला सोटा आणि गुद्द्याला गुद्दा या पक्षाचा आहे मी ! "

बुटाचा बांकावर ठेवलेला पाय खालीं न ठेवतां तोंडांतला विडा चघळीत तो मुसलमान माणूस रंगेल नजरेनें त्या गृहस्थाकडे पाहत म्हणाला, "तुमचें बोचकें पलीकडे शेजारीं ठेवलें आहे तें आधीं खाली ठेवा. एवढी मोठी ऐसपैस माडी व घालून बाकावर बसलां आहात तुम्हीं, तो हा बांक काय तुमच्या बापाचा आहे होय ? , त्याबरोबर तो महासभावादी तिसऱ्या सप्तकांत आवाज चढवून एकदम ओरडला " हां–हां ! माझा बाप काढाल तर–तर याद राखा ! " मुसलमानाचा चेहरा आणि आवाज पहिल्याप्रमाणेंच अगदीं शांत होता. तो म्हणाला "असं का ! तुमचा बाप आम्हीं काढायचा नाहीं ! अन् तुम्हीं आमचा बाप काढायचा का ? काय म्हणत असतां तुम्हीं ? ' हिंदुस्थान हिंदुओंका , नहीं किसीके बापका.' काय ? हिंदूंच्या बापाचा हिंदुस्थान काय हा ? आमच्या बापाचें कांहीं इथें नाहीं—नाहीं का ? "

" मग त्यांत काय खोटें आहे ? बोलून चालून हा ' हिंदु ' स्थानच आहे ?" महासभावादी थोडासा नरमून म्हणाला. आपल्या भगव्या राजकारणाची त्या मुसलमानाला इतकी माहिती असेल अशी त्याला कल्पना नव्हती.

"ही–ही तुम्हा हिंदूंची असली मग्रूरी आहे म्हणूनच आमचे कायदे-आझमसाहेब पाकिस्तान मागतात ! " मुसलमान जरा त्वेषानेच म्हणाला.

" तर–तर पाकिस्तान मिळतंय तुम्हांला " महासभावादी उसळून म्हणाला, " बघूं कसं पाकिस्तान मिळतंय तुम्हांला तें ! खून पडतील खून ! "

"आमची कुठं ना आहे ! " मुसलमान जरा गंमतीनेंच म्हणाला. " तिसऱ्या पानपतच्या लढाईनें तुमची खुमखुमी अजून जिरली नसली तर चौथी पानपतची लढाई लढायला आमची फिरून तयारी आहे ! "

पानपतच्या लढाईचा उल्लेख मुसलमानानें करतांच महासभावादी चांगलाच चिरडीला आला मुसलमानांच्या चांगला वर्मी लागेल असा टोमण मारावा याच्या तो क्षणभर विचारांत पडला तोंच दोन हातावर खादीचे फाटके आणि मळके कपडे घातलेला आणि खप्पड गालाचा एक हाडकुळा माणूस बसला होता तो एकदम उठून त्या मुसलमानाला मिनतवारीच्या स्वरांत म्हणाला, "अजी खानसाहेब, आप मेरी जगाह पर तश्रीफ लायिये, मै उधर बैठता हूं. खामखां झगडा क्यूं ? " त्याबरोबर महासभावादी एकदम डोळे वटारून ओरडला, " अहो गांधी, आपण तिथेंच

बसा ! तुम्ही इथें येऊन माझ्या शेजारीं बसण्यापेक्षां हे खानसाहेबच पत्करले ! " त्याबरोबर डब्यांत एकच हंशा पिकला आणि त्या 'हिंदु-मुसलमानां ' च्या भांडणामुळें तापलेलें तेथळें गरम वातावरण एकदम थंड झालें. महासभावादी आपल्या चंचींतलें पान खानसाहेबापुढे करून म्हणाला , ' अहो, तसे कांहीं तुमचें आमचें भांडण नाहीं ! सिंधमध्यें अन् बंगालमध्यें मुस्लिम लीगबरोबर संमिश्र मंत्रिमंडळें स्थापन करायला मुळींच हरकत नाहीं, असें वीर सावरकरानीं मागें पत्रक नव्हतें कां काढले ? आमचें खरें भांडण या गांधीवाल्याशी आहे. त्याचा कांटा निघाल्यावाचून देशाला स्वराज्य मिळावयाचें नाहीं. "

हिंदुसभावादी आणि मुसलमान त्या खादीधारी हाडकुळया माणसाकडे पाहून मोठमोठ्यानें हसूं लागले ! खादीधारी माणसाच्या सहनशीलतेलाही कांहीं मर्यादा होत्या ! तो शांतपणें म्हणाला, " बघूं आपण आतां या निवडणुकींत काय होतंय तें ! "

निवडणुकीचें नांव निघतांच महासभावादी मोठ्या खुषींत आला. त्या मुसलमानाला एक डोळा मारून तो म्हणाला, " बघूं-बघूं-! कोणाचं डिपॉझिट जप्त होतंय ते ! आमच्या भोपटकराचें होतंय का तुमच्या गाडगीळाचें होतंय ! "



इतक्यांत गाडी ठाण्याच्या बोगद्यांत शिरली आणि डब्यांत दिवे नसल्यामुळें त्या अंधारांत ते भांडण तसेंच राहिलें. पुढें गाडी तळेगांवला पोहोंचेपर्यंत दोन अडीच तासांत तीन-चार वेळां तरी निवडणुकीचें तें भांडण पुन्हां पुन्हां उसळून वर येत

होतें ! अगदीं आंतली खाजगी माहिती असल्याप्रमाणें महासभावादी छातीवर हात मारून सांगत होता कीं, भोपटकरांना गाडगीळांपेक्षां काय वाटेल तें झालें तरी पाच हजार मतें जास्ती मिळाल्याखेरीज राहत नाहींत ! आणि त्यावर तो खादीधारी हडकुळा माणूस शांतपणें हंसून, " भोपटकरानी गाडगीळांना पाडावयाला दहा जन्म घेतले पाहिजेत ! " असें जेव्हां म्हणे, तेव्हां त्याला खाऊं कीं गिळूं असें त्या महासभावाद्याला होऊन जाई. आणि तें दोघांचें भाडण त्या ' खानसाहेबाला ' मिटवावें लागे ! ही गंमत मी कोपऱ्यांत बसल्या बसल्या शांतपणें पाहत होतों.

खादीचे फाटके कपडे घातलेल्या त्या हाडकुळ्या माणसाविषयीं मला मोठी मौज वाटूं लागली. तसें पाहिलें तर तो एका थपडीचा देखील नव्हता ! पण भगव्या टोपीवाल्याला आणि त्या मुसलमानाला वादामध्यें हार गेला नाहीं. उलट त्यानें त्यांना चांगलेंच रडकुंडीस आणलें !

तळेगांवला गाडी थांबून एक मिनिट अर्धे मिनिट होतें आहे नाहीं तोंच, आमच्या डब्यासमोर दहा पंधरा माणसांची गर्दी झाली, आणि त्यांपैकीं एकजण घाईघाईनें डब्याचें दार उघडून आंत आला व " जागा करा–जागा करा ! " असें किंचित् हुकमतीच्या स्वरानें सांगूं लागला. त्याच्या मागोमाग एक खादीचे कपडे घातलेला प्रौढ वयाचा माणूस सस्मित चेहऱ्यानें आंत शिरला ! त्याच्या मुद्रेवरूनच तो कोणी तरी सुप्रसिद्ध कॉंग्रेस कार्यकर्ता होता, हें कोणीही ओळखलें असतें. आणि त्या डब्यां-

तल्या चार-दोन माणसांनीं त्याला खरोखरच ओळखलें होतें! ते पटापट आपल्या जागेवरून उठले आणि "या भाऊसाहेब, या भाऊसाहेब!" असें म्हणून त्यांना आपल्या जागेवर बसण्याबद्दल आग्रहानें विनवूं लागले. भाऊसाहेबांनीं त्या सर्वांना अत्यंत विनम्रतेनें नमस्कार केला आणि सस्मित चेहऱ्यानें ते एका जागेवर जाऊन बसले. भाऊसाहेबांच्या मागून आलेल्या एका माणसानें बरेचसे फुलाचे हार आणि गोटे भाऊसाहेबांच्या जवळ ठेवून दिले. आणि मग तो बाहेर गेला. क्षणभरानें गाडी सुरू होतांच बाहेरून 'महात्मा गांधी की जय'चा मोठा घोष झाला. भाऊसाहेबांनीं किंचित् उठून बाहेरच्या सर्व मंडळींना नमस्कार केला. डब्यांतील सर्व मंडळी भाऊसाहेबांच्याकडे अत्यंत आदरानें पाहूं लागलीं. केवढा मोठा पुढारी आपल्या डब्यांत येऊन बसलेला आहे या कल्पनेने त्यांच्या आजूबाजूला बसलेल्या उतारूंना अगदीं धन्य वाटलें. महासभावादी गृहस्थ खानसाहेबांच्या आडून खानसाहेबाच्याकडे टवकारलेल्या डोळयानें बघूं लागला. कांहीं वेळ कोणीच बोललें नाहीं. शेवटीं खादीधारी हाडकुळा माणूस धीर करून हंसत हंसत हळूच पुटपुटला, "आज व्याख्यान होतं वाटतं तळेगांवला?"

एखाद्या समाधींतून जागें व्हावे तशा आविर्भावानें भाऊसाहेबानीं त्या माणसाकडे पाहिले आणि क्षणभरानें त्याचा प्रश्न आठवल्यासारखें करून ते अडखळत म्हणाले, "हो-हो-व्याख्यान होतं तळेगांवला-पंडित जवाहरलालचा वाढदिवस ना आज!"

भाऊसाहेबांच्या चेहऱ्याकडे अनिमिष नेत्रांनीं पाहणाऱ्या भोंवतालच्या मंडळींचा आदर आणखीच दुणावला ! पण कोणी कांहींच बोललें नाहीं ! कांहीं वेळानें पुन्हां कुणी तरी भाऊ-साहेबाना विचारलें, " निवडणुकीचा रंग काय दिसतो आहे ! "

क्षणभर भाऊसाहेब कांहींच बोलले नाहींत ! डब्यांत शांतता अधिकच पसरली.

" निवडणुकीचा प्रश्न आहे हा ! नक्की कसें सांगतां येईल ? " भाऊसाहेब हलक्या स्वरात म्हणाले, " पण कॉंग्रेसचे सारे उमेद-वार बहुतकरून निवडून यावेत असें मला वाटते. आजच्या व्याख्यानांत हेच मी लोकांना सांगितलें ! इतकीं वर्षे तुरुंगांत जाऊन देशासाठीं आम्ही ज्या हालअपेष्टा सहन केल्या त्याचा जनतेकडून एवढा देखील मोबदला मिळूं नये काय ? "

भाऊसाहेबांनीं भोंवतालच्या मंडळींकडे हळूहळू वळून पाहत हा प्रश्न केला. सर्वांनीं हंसून माना डोलावल्या आणि भाऊसाहे-बाच्या प्रश्नाला होकार दिला. फक्त तो हाडकुळा माणूस मात्र हंसला नाहीं. आणि त्यानें आपली मान डोलावली नाहीं. हें माझ्या लक्षात आल्यावांचून राहिलें नाहीं.

पुन्हा मध्ये कोठलें तरी एक स्टेशन आलें आणि ते बोलणें तितक्यावरच थाबलें. माझ्या शेजारीं बसलेला एक उतारू हळूच माझ्या कानांत कुजबुजला, " यांना आतांपर्यंत किती शिक्षा झाली असेल हो ? "

मला तरी काय माहित होतं ? मी अदमासानें म्हणालों, " कमींत कमी आठ-दहा वर्षें तरी. पुढारी आहेत ना ते ! सर्वा ग

आधीं यांना पकडतात!" मला विचारणाऱ्या माणसाची छाती माझ्या उत्तराने अगदीं हबकूनच गेली. तो तोंडाचें वर्तुळ करून भाऊसाहेबांकडे रोखल्या दृष्टीनें बघूं लागला.

महासभावादी माणूस इतका वेळ गप्प बसला होता. त्याला वाटलें आपल्याला बोलायला हा चांगला मोका आहे. तो भाऊसाहेबांना ऐकूं जाईल एवढ्या मोठ्यानें शेजारच्या मुसलमानाला म्हणाला, "खानसाहेब, देशासाठीं जर खरी शिक्षा कोणी भोगली असेल तर ती आमच्या वीर सावरकरांनीं! एका आयुष्यांत दोन जन्मठेपी! काय चेष्टा आहे! या कॉंग्रेसवाल्यांचें तुरुंगांत जाणें म्हणजे 'ए' नाहीं तर 'बी' वर्गात जाऊन पावलोणी खायचें आणि खुशाल पाय ताणून झोंपा काढायच्या! —"

"आणि वर वजन उतरलें म्हणून सरकारकडे तक्रार करीत सुटावयाचें!" खानसाहेबांनीं मोठ्यानें हंसून वाक्य पुरें केलें. "परवां पेशावरला आमच्या कायदेआझमसाहेबांनीं एका व्याख्यानांत हेंच सांगितलं!"

भाऊसाहेब डब्यांतून डोकें काढून बाहेर बघत होते. त्यांनीं हा संवाद ऐकला न ऐकल्यासारखेंच केलें. तथापि, डब्यांतले उतारू त्या महासभावाद्याकडे आणि मुसलमानाकडे चिडलेल्या चेहऱ्यांनीं बघूं लागले. पण महासभावाद्याचें आणि खानसाहेबाचें हें बोलणें त्या खादीवाल्या हडकुळ्या माणसाला मात्र आवडल्यासारखें दिसलें. त्याचे डोळे मिष्किलपणानें हंसत आहेत हें माझ्या चटकन् लक्षांत आलें आणि मला त्या माणसाचा थोडासा रागही आला. इतक्यांत शिवाजीनगर स्टेशन आलें. त्याबरोबर

भाऊसाहेब उतरण्यासाठीं उठले. खादीधारी हाडकुळा माणूस चेहऱ्यावरचा आपला आविर्भाव बदलून एकदम आपल्या जागे-वरून उठून पुढें झाला, आणि त्यानें भाऊसाहेबांचे सारे हार आणि गोटे मोठ्या अदबीनें उचलून दरवाजापर्यंत नेले. डब्यां-तल्या मंडळींना सस्मित चेहऱ्यानें नमस्कार करून भाऊसाहेब डब्यांतून खालीं उतरूं लागले. तोंच हाडकुळा माणूस हंसून भाऊ-साहेबांना म्हणाला, " मला ओळखलं नाहींत वाटतं भाऊसाहेब !' भाऊसाहेब एकदम निर्विकार डोळ्यांनीं त्या माणसाकडे बघूं लागले. तेव्हां हडकुळा माणूस हंसून म्हणाला, " मी जगू जाधव ! सोलापूरच्या झेंडासत्याग्रहांत--" पण पुढचे शब्द भाऊसाहेबांनीं ऐकलेच नाहींत ! बाहेर त्याच्या स्वागतार्थ जमलेल्या घोळक्यानें 'महात्मा गांधी की जय ! ' अशा गर्जना करतांच भाऊसाहेबांनीं एकदम तिकडे वळून पाहिलें आणि ताबडतोब ते डब्यांतून उतरून अंधारामध्यें त्या घोळक्यांत दिसेनासे झाले. भाऊसाहेबांचे हार अन् गोटे तसेच जगू जाधवाच्या हातात राहिले. इतक्यांत गाडी सुरू झाली. जगूनें तोंड आंत वळविलें, त्याचा चेहरा पार बदलला होता. त्याचे डोळे डबडबले होते, पण बाकीची मुद्रा मात्र अत्यंत कठोर झाली होती ! त्याच्यांत एकदम असा हा फरक कां झाला याची कल्पना होईना ! मी त्याच्या तोंडाकडे पाहतच राहिलों.

कोणी तरी जगूला म्हणालें, " अरे भाऊसाहेबांचे ते हार--"

जगूनें आपल्या हातांत राहिलेल्या त्या हाराकडे एकवार पाहिलें आणि खिडकीमधून एकदम ते बाहेरच्या अंधारांत फेंकून दिले व धोतराला हात पुशीत तो शांतपणें आपल्या जागेवर

येऊन बसला. त्याच्या त्या चमत्कारिक वर्तनानें डब्यांतल्या मंडळींना चांगलाच धक्का बसला ! खादीचे कपडे घालणारा हा माणूस अन् कॉंग्रेसपुढाऱ्याचे हार असे खिडकींतून फेंकून देतो–

कांहीं वेळानें खिशातून एक विडी काढून ती पेटवीत जगू खिन्नपणें हंसत म्हणाला, "तुम्हां–आम्हाला हारांची किंमत ! या पुढाऱ्यांना त्यांचें काय होय ? रोज त्यांच्या गळ्यांत असे किती तरी हार पडतात."

जगूच्या या म्हणण्याला कोणीच साथ दिली नाहीं. कांहीं वेळानें मी हळूच त्याला विचारलें, "मघाशीं सोलापूरच्या झेंडा सत्याग्रहाबद्दल काय म्हणत होता तुम्ही भाऊसाहेबांना ?"

जगूनें माझ्याकडे वळून पाहिलें. क्षणभर थाबला तो आणि एकदम उद्गारला, "त्या सत्याग्रहांत मला अडीच वर्षांची शिक्षा झाली होती साहेब ! भाऊसाहेब अन् आम्ही बरोबरच होतों येरवड्याच्या तुरुंगांत !" आपल्या आयुष्यांतील जणुं कांहीं ही एक अगदीं सामान्य गोष्ट आहे, अशा अपेक्षेनें विडीचा धूर नाकातोंडामधून सोडीत जगू म्हणाला.

"अडीच वर्षांची शिक्षा झाली होती तुम्हांला ?" भोवतालचे पांच सहा लोक डोळे वासून जगूकडे पाहत ओरडले. महासभावादी आपली भगवी टोपी डोक्यावरून मागें सारीत जगूकडे टवकारून बघूं लागला.

जगूनें हातांतली जळकी विडी खिडकीमधून फेंकून दिली. त्याचा चेहेरा एकदम प्रक्षुब्ध झाला. तो उठून उभा राहिला आणि भोंवतालच्या लोकांकडे पाहत म्हणाला, "हे भगवे टोपी-

वाले म्हणतात तसली पावलोणी खायची अन् झोंपा काढायची शिक्षा नव्हती मिळाली मला ! तुरुंगांत माझ्या वांट्याला कसली शिक्षा आली ती पाहायची आहे तुम्हाला ?" असें म्हणून जगूनें आपला फाटका कोट अन् सदरा एकदम तसाच हातांतून वर उचलला आणि आपली पाठ फिरवून तो सगळ्याना दाखवूं लागला.

पाहवेना मला तें ! त्याच्या त्या हाडकुळ्या पाठीवर वीस-पंचवीस काळेनिळे मोठमोठे वळ उठलेले होते ! कमरेपासून मानेपर्यंत आडवेतिडवे उभे-वाकडे ! पाठीचे कातडें ठिकठिकाणीं जणूं कांहीं फाटून निघाले होतें !

" काय हें ! " असह्य भावनेनें मी ओरडलों.

" वेताचे वळ म्हणतात यांना. चार दिवस मी हे एकसारखे खात होतों. पाठीमधून रक्ताच्या धारा वाहत होत्या माझ्या ! आणि त्यावर मिठाच्या पाण्याचा मारा होत होता ! यानंतर सहा महिने मी इस्पितळांत पडून होतों ! मरतां मरता केवळ नशिबानें म्हणून वांचलों ! आणि जन्माचा हा पंगू होऊन बसलों आहें ! "

कडकडून जगूला मिठी मारून त्याच्या साऱ्या पाठीचें चुंबन घेत सुटावे असें मला वाटले ! वारे मर्द ! वारे वीर ! माझ्या मनांत जी भावना आली तीच त्या डब्यांतील साऱ्या उतारूंच्या मनांत आली असली पाहिजे. भगव्या टोपीवाल्याचा चेहराहि क्षणभर पाढरा फटफटीत पडला आणि खानसाहेबांनीं आपल्या तोंडांतला विडा बाहेर थुंकून गालावर हलकेच चापट्या मारीत ' तोबा ! तोबा ! ' असे उद्गार काढले.

जसें कांहींच झालें नाहीं असा चेहरा करून जगू पुन्हा शांतपणें आपल्या जागेवर बसला आणि त्यानें आपली विडी शिलगावली. विडीचा झुरका सोडून तो म्हणाला, " भाऊसाहेबांच्या गळ्यांतले हार साऱ्या जगाला दिसतात. पण या जगू जाधवाच्या पाठीवरचे वळ केवळ त्याच्याच जीवाला अन् त्याच्याच देवाला माहित ! "

जगूचे ते जळजळीत बोल माझें काळीज फाडीत फाडीत आंतपर्यंत गेले. मी निर्जीव स्वरानें त्याला विचारलें, " हल्ली काय करता ? "

जगू चमत्कारिक हंसला. आणि माझ्याकडे पाहत म्हणाला, "कांहीं करीत नाहीं ! बेकार आहें ! चार महिन्यापूर्वी याच भाऊसाहेबाच्या दाराशीं धरणें धरून बसलों होतों. ते म्हणाले, ' तुरुंगांत गेलेल्या साऱ्या माणसाना नोकऱ्या मिळवून द्यावयाला मी काय बांधला गेलों आहे काय ? ' बरोबर आहे. त्यांचे फार मोठे पुढारी आहेत ते ! आज तर त्यांनीं मला ओळखलेंही नाहीं ! तरी बरें ! सहा महिने माझ्या किंकाळ्या ऐकत होते ते येरवड्याच्या तुरुंगात ! "

" मुंबईला कशाला गेला होता ? " मी विषय बदलण्यासाठीं म्हणालों.

" यांच्यासारख्याच आणखी एका तेथल्या भाऊसाहेबांना भेटायला ! त्यांचेंहि तेंच उत्तर ! आलों हात हलवीत हे असे परत न् काय ? अरेच्या, आलें वाटतें पुणें स्टेशन ! राम राम मंडळी ! येतों ! तिकीट नाहीं मजजवळ ! म्हणून कुठून तरी उडी मारून मला स्टेशनाबाहेर पडलें पाहिजे ! "

गाडी स्टेशनवर थांबते न थांबते तोंच जगू दार उघडून आणि उडी मारून बाहेरच्या हमालांच्या गर्दीत कुठें पसार झाला कोणास ठाऊक. डब्यांतील सर्व उतारू गेल्यावर एकाद्या स्वप्नांतून जागा व्हावा तसा मी उठलों आणि हळूहळू डब्याबाहेर पडलों. स्टेशनाबाहेर कसा पडलों तें मला आठवत नाहीं. पुष्कळ दिवस झाले या गोष्टीला; भाऊसाहेबांचे ते हार अन् गोटे मी कधींच विसरून गेलों आहें, पण जगू जाधवाच्या पाठीवरचे वळ मी या जन्मांत तरी विसरणें शक्य आहे काय ?



# पहिलें कावळे संमेलन २

महाराष्ट्रांत कौटुंबिक संमेलनें भरविण्याची जी अनिष्ट प्रथा काहीं प्रतिगामी आणि जातीय वृत्तीच्या बुद्रुकांनीं अलिकडे सुरू केलेली आहे, त्याचें मार्मिक विडंबन या लघुकथेमध्यें केलेले तुम्हाला आढळेल !

पुण्याला येऊन त्यावेळीं मला पांच सहा महिने झाले असतील. कसबा पेठेंतील धडफळ्यांच्या वाड्यांत एका दोन खणी अंधाऱ्या खोलींत मी रहात होतों. भाडें होतें महिन्याचें तीन रुपये. तुम्ही म्हणाल, बाकीचें एवढें सारें पुणें सोडून कसबा पेठेंतल्या धडफळ्यांच्या वाड्यांत कशाला गेलांत धडपडायला ? तर त्याला एक कारण असें कीं, ज्या दैनिक वर्तमानपत्रामध्यें महिना पसतीस रुपयावर सहसंपादक म्हणून माझी नेमणूक झाली होती, त्या दैनिकाचा छापखाना आणि कचेरी अगदीं धडफळ्यांच्या वाड्यासमोर—म्हणजे, समोरच्या बोळांत होती. आणि दुसरें महत्वाचें कारण म्हणजे ज्या काकूबाईच्या खाणावळींत मी महिना

पंधरा रुपयांच्या दरानें दोन्ही वेळां जेवून अक्षरशः ‘ उदर-निर्वाह ’ करीत होतों, ती पुण्यांतील काकूबाईची सुप्रसिद्ध खानावळ धडफळयांच्या वाडयापलिकडे दोन घरें टाकून काव-ळ्यांचा वाडा जो होता किनई, त्या वाडयामध्यें होती.

कां हंसलातसे ! मला ठाऊक आहे तुम्ही कां हंसलांत ते ! पसतीस रुपये महिन्यावर मी पुण्यांतल्या एका दैनिक वर्तमान पत्रामध्यें सहसंपादकाचें काम करीत होतों ही एक माझी ‘ लोणकढी ’ आहे असें तुम्हांला वाटते आहे ना ? मग आतां तुम्हांला म्हणून सांगतो, मात्र दुसरीकडे कोठें बोलूं नका. वास्तविक माझी मूळ नेमणूक त्या वृत्तपत्रांत ‘ शहर बातमीदार ’ म्हणूनच झाली होती. पण माझ्या बरोबरीचे इतर सारे फुटकळ बातमीदार आपण त्या पत्राचे सहसंपादक आहोंत अशा थापा मारीत गांव-भर हिंडत असत. तेव्हां मींहि मनांत विचार केला कीं मग आपणच एकट्यानें काय घोडें मारलें आहे ! मींहि तेव्हांपासून त्यांच्याप्रमाणेंच दडपून सांगूं लागलों कीं मी देखील त्या वृत्त-पत्राचा सहसंपादकच आहे म्हणून !

शिवाय दुसरी एक गोष्ट अशी कीं—सांगू का ? लाज वाटते—पण सांगतोंच—मी त्या वेळीं स्वतःचें लग्न· जमविण्याच्या खट-पटींत होतों. तेव्हां त्या दृष्टीनें आपण बातमीदार आहोंत ही गोष्ट शक्य तितकी लपवून ठेवून आपल्या सहसंपादकीची जाहि-रात चारचौघांत करीत रहाणें ही गोष्ट मला अधिक मुत्सद्दे-गिरीची वाटली !

तुम्हांला मी आतांच सांगितलें कीं ज्या काकूबाईच्या खाना·

वळीचा मी मेंबर होतों, ( आणि ज्या काकूबाईच्या खानावळीं-तली भयंकर आमटी चार महिने साजसकाळ ओरपून मी शक्य ति-क्या लवकर लग्न करण्याची अगदीं 'भीष्मप्रतिज्ञा' केली होती ! ) ती काकूबाईची खानावळ कावळ्यांच्या वाडयांत होती. वाडा कसला म्हणा ! होतें आपलें एक तीन खणी दुघई जुनें पुराणें घर ! पण पुण्यांत प्रत्येक फाटक्या तुटक्या माणसाला 'साहेब' आणि मोडक्या तोडक्या घरास 'वाडा' म्हणण्याची पेशवाई-पासूनची जुनी पद्धत आहे ना ? नाहीं तर ज्या घराला 'काव-ळ्याचें घरटें' म्हणून म्हणायला देखील कोणी तयार झालें नसतें त्याला त्या टिचभर गल्लीपुरता का होईना पण 'कावळ्यांचा वाडा' असा मानाचा किताब कसा मिळून राहिला असता हो ! एवढेंही करून त्या घराला रस्त्यावरचे जाणारे येणारे लोक 'वाडा' म्हणून संबोधायला कदाचित् तयार होणार नाहींत अशी रास्त शंका वाटल्यावरूनच कीं काय घरमालक केसो काशिनाथ उर्फ काकासाहेब कावळे यांच्या इंग्रजी शाळेंत शिकणाऱ्या दोन आणि मराठी शाळेंत शिकणाऱ्या तीन पोरांनीं त्या घराच्या दारावर आणि भिंतीवर 'कावळे यांचा वाडा' अशीं भलीं मोठीं अक्षरें इंग्रजी आणि मराठी अशा दोन्हीही भाषेंमध्यें शाळेंतून चोर-लेल्या खडूनें आणि स्वयंपाकघरांतून पळविलेल्या कोळशानें लिहून ठेवलेलीं होतीं.

'वाडया'चे मालक केसोपंत कावळे यांचा एकंदर चेहरा-मोहरा त्या वाडयाच्या पौराणिक स्वरूपाला सर्वस्वी शोभण्या-सारखाच होता. खानावळींतून जातांयेतां केसोपंताच्या अंगावरून

छपन्न वेळां मला जावें लागत असे. तथापि, मशारनिल्हे गृहस्थ हा त्या घराचा मालक असावा अशी चुकून देखील मला कधीं शंका आली नाहीं. खानावळींत जेवतां जेवतां समोरच्या बिऱ्हाडांत त्यांचीं पांच पोरें आणि सत्रा अठरा वर्षांची एक थोरली मुलगी ही हरहमेशा वावरतांना मला साहजिकच दिसत असत. ( अर्थात्, स्वतःचें लग्न जमविण्याच्या दृष्टीनें मी जगाकडे पाहूं लागल्या-पासून वयांत आलेल्या मुली माझ्या डोळ्यांत अधिक चटकन् भरत असत हें ' तज्ज्ञ ' वाचकांना सांगायला नकोच. ) तेव्हां हा सूर्य आणि हा जयद्रथ या न्यायानें समोरच्या घरांतील पोर-वडयामधून स्थितप्रज्ञ चेहऱ्यानें वावरणारा हा फाटक्या अंगाचा आणि दाभणकाठी मिशाचा माणूस हा त्या साऱ्या पोरवडयाचा निर्माता असला पाहिजे ही उघडाउघड गोष्ट माझ्या डोक्यांत न ठसल्यावांचून कशी राहील बरें ? तथापि इतकें झालें तरी ही स्वारी या घराची अथवा 'वाडया' ची मालक असेल ही गोष्ट मात्र पुष्कळ दिवसपर्यंत माझ्या ध्यानीं आली नाहीं ! कां कोण जाणें !

एके दिवशीं संध्याकाळीं खाणावळींत जात असतांना दरवा-जाच्या लांबलचक अंधाऱ्या बोळकंडींत केसूकाकांची आणि माझी चांगलीच टक्कर झाली. केसूकाकांच्या ओठाबाहेर आलेले त्याचे दोन दांत जवळ जवळ माझ्या हनवटींतच शिरले म्हणानात ! अंधारांत दोघेही आम्ही एकमेकांना दिसलों नाहीं. डाव्या हातानें हनवटी दाबून धरीत मी घरमालकाच्या नांवानें अशी एक गर-गरीत शिवी हसडली म्हणतां ! " दरवाजांत संध्याकाळचे वेळीं दिवा न लावणारा हा साला मालक आहे का..."

केसोपंत चटकन् माझा हात पकडून पुटपुटले, " मला ओळखलं नाहीं वाटतं—मी घरमालक—कावळे ! "

त्यावेळीं अंधार होता म्हणून बरें ! नाहींतर आमचे उभयतांचे जिरलेले चेहेरे एकमेकापासून लपवितां लपवितां आम्हा दोघांची चांगलीच त्रेधा उडाली असती. तसाच माझा हात धरून केसोपंत मला आपल्या घरांत आग्रहानें घेऊन गेले. ( उजेडांत आल्यावर केसोपंताचा एक दांत त्या टक्करींत ' कामास आल्या 'चें मला आढळून आलें ! ) त्या रात्रीं अर्थात्च मला केसोपंतांकडे जेवावें लागलें हें निराळें सांगायची आवश्यकता नाहीं ! अशा अकल्पित तऱ्हेनें केसोपंतांची अन् माझी पहिल्यानें पछान झाली. आणि त्याच वेळीं मला त्यांच्याबद्दलची कांहीं त्रोटक माहिती खुद्द त्यांच्या तोंडूनच कळाली.

भाव्यांच्या हायस्कूलांतून ' स्कूल फायनल ' पास झाल्यानंतर केसोपंत सदर्न मराठा रेल्वेच्या माल धक्यावर गेलीं सत्तावीस वर्षें गुड्स क्लार्कच्या हुद्दयावर काम करीत असून महिना त्यांना साठपासष्ट रुपये पगार होता. शिवाय घरभाडयाचे महिना पंधरा सोळा रुपये त्यांना मिळत होते ते निराळे. त्यांचा थोरला मुलगा चि. नरहरि हा फुरसंगीला स्टेशनमास्तर असून, त्यांच्या वयांत आलेल्या ज्या मुलीबद्दल मी मघाशीं सांगितलें, ती कु. गंगू कावळे ही गेल्या वर्षी व्ह. फा. झाली असून ती सहाव्या नंबरच्या मुलींच्या शाळेंत दोन महिन्यासाठीं बदली म्हणून एका स्कूलबोर्डाच्या मेंबराच्या वशिल्यानें नुकतीच ' लागलेली ' होती. गंगू ही दोन महिन्यासाठीं कां होईना पण म्युनिसिपालटीच्या

शाळेंत मास्तरीण असूं शकते हें कळतांच माझ्या मनांत तिच्या-बद्दल तत्पूर्वी असणाऱ्या सामान्य स्वरूपांच्या आकांक्षांना एक क्षणांत विशेष स्वरूप प्राप्त झालें! बरोबरच आहे, सुशिक्षित बायको मिळण्याची शक्यता कोणत्या तरुणाला आकर्षक वाटणार नाहीं? तोच मोका साधून गंगूच्या मनावर ठसेल अशा ठसक्यानें मी शेजारच्या बोळांतील दैनिक वर्तमानपत्राचा सहसंपादक आहे असें मी केसूकाकांना मोठ्या ऐटीनें सांगून टाकलें! गंगू कांहींच बोलली नाहीं; पण आमच्या पुस्तकांना 'कव्हरें' घालायला तुमच्या वर्तमानपत्रांचे अंक द्या म्हणून केसोपंतांच्या पोरांनीं मात्र माझ्या भावतीं गिल्ला करावयाला कमी केलें नाहीं!

—आणि त्या दिवसापासून केसूकाकाबद्दल मला आदर वाटूं लागला. मोडक्या तोडक्या का होईना पण पुण्यातील एका 'वाड्या'चा मालक—आणि त्यातून पुन्हां एका तरण्याताठ्या उपवर मुलीचा बाप! चेष्टा आहे? भाड्याच्या खोलींत राहून खानावळींत जेवणाऱ्या माझ्यासारख्या बिनलग्नवाल्या उपऱ्या फटिंगाच्या दृष्टीनें केसोपंताची 'पोझिशन' तर फारच मोठ्या अधिकाराची होती. किंबहुना, आमच्या दे. भ. काकासाहेब गाडगीळांच्या आवडत्या भाषेंत सांगायचें म्हणजे केसोपंत होते 'आहे-रे!' आणि मी होतों 'नाहीं-रे'! तथापि, केसोपंताच्या आयुष्याला आणखी एक महत्त्वाची तिसरी बाजू होती ती मला पुढें दहा पंधरा दिवसांनीं कळाली.

एका शुक्रवारच्या 'केसरी' मध्यें पांचव्या पानावर पहिल्या स्तंभाच्या तळाला छापून आलेला पांच सहा ओळींचा मजकूर

वाचून मी सपशेल चाट झालों! डोळे फाडफाडून मी तो मजकूर पुन्हां वाचूं लागलों.

कावळे आडनांवाच्या
सर्व बंधूंचें समेलन

भारद्वाज गोत्राच्या तीन प्रवर असलेल्या सर्व कावळे आडनांवाच्या बंधू भगिनींचें पहिलें जाहीर संमेलन पुढील महिन्यांत पुणें येथें भरविण्याचें मुक्रर झालेलें आहे. (डोमकावळे आडनांवाच्या मंडळींनाही यांत सामील होतां येईल.) तरी महाराष्ट्रातील सर्व कावळे कुटुंबांनीं आपापले संपूर्ण पत्ते खालील पत्त्यावर महिना अखेरीच्या आंत कळवावेत म्हणजे त्यांना व्यक्तिशः आमंत्रणें व कार्यक्रम पाठविण्यास सोईचें होईल.

वि. सू.:—

आम्हीं लिहिलेला ‘ कावळे कुळाचा संपूर्ण वृत्तांत ’ याच प्रसंगीं प्रसिद्ध होईल.

केसो काशिनाथ कावळे
( गुडस् क्लार्क, एस. एम्. आर. )

कावळ्यांचा वाडा, तांबट गल्ली,
कसबा पेठ, पुणें

किती वेळ तरी मी त्या मजकुराकडे पहात राहिलों! माझा माझ्या डोळ्यांवर विश्वासच बसेना! हा–हा आपला केसोपंत कावळे–रोज सत्रा वेळ ज्याची आपली गाठ पडते आणि ज्याच्या तोंडावरची माशी देखील उठत नाहीं, तो हा खप्पडगालाचा व दाभणकाठी मिशांचा केसोपंत 'समस्त कावळे कुटुंबीयांचें पहिलें संमेलन' भरविण्याचें अखिल महाराष्ट्राला जाहीर आव्हान देऊं शकतो! एवढेंच नव्हे, तर हा माणूस 'कावळे कुळाचा संपूर्ण वृत्तांत' देखील लिहूं शकतो! कमाल केली कीं या माणसानें! छे, छे, जगांत कोणता माणूस काय करील! बाकी चेहऱ्यावरून माणसाचें कांहीं–कांहीं कळत नाहीं! अशाच अर्थाचें कांहींसें स्वतःशीं पुटपुटत 'केसरी'चा अंक काखोटींत मारून मी तडक केसोपंताच्या बिऱ्हाडीं गेलों.

केसोपंत न्हाव्यापुढें बसले होते. त्यांची श्मश्रू जवळ जवळ संपतच आली होती. बगलेंतलें शेवटचें 'कृत्य' चाललें होतें. 'केसरी'चा अंक त्यांच्यापुढें करून मी म्हणालों, "कमाल केली कीं केसोपंत तुम्ही? ही–ही कला तुमच्या अंगांत असेल याची मला खरोखरच कल्पना नव्हती!"

धोतरावर सांडलेले केस खालीं झटकत केसोपंत हंसत हंसत उठेल आणि चष्म्याच्या वरून माझ्याकडे पहात म्हणाले, "अहो, हल्लींच्या काळांत प्रत्येकानें आपापलें पोट भरण्यापलीकडे समाजाची कांहीं तरी सेवा करायला पाहिजे! नको का?"

"पण मी म्हणतो तुम्हाला हा कावळे घराण्याचा वृत्तांत लिहायला वेळ तरी कधीं मिळाला? आणि तुम्ही ही सारी

माहिती जमा तरी कोठून केलीत ? " मी सतरंजीवर बैठक मारीत म्हणालों.

त्यावर केसोपंताचा चेहरा एकदम गंभीर झाला. जानव्याला बांधलेल्या दांतकोरण्यानें दांत कोरीत ते माझ्याकडे वळून म्हणाले " एडिटर साहेब, ( यावेळीं माझी छाती दोन इंचांनीं तरी वाढली असेल ! ) आमचे कावळे घराणें सामान्य नाहीं. आमची फॅमिली हिस्टॉरिकल आहे. शिवाजीमहाराजांच्या पदरीं कोन्हेर मैराळ पिंगळे नांवाचे जे एक मुत्सद्दी होऊन गेले ते आमच्या घराण्याचे मूळ संस्थापक ! "

" मग तुम्ही पिंगळ्याचे कावळे कसे झालांत ? " गोखल्यांचे रास्ते कसे झाले या प्रश्नाच्या चालीवर मी एकाद्या शाळकरी अर्भकाच्या अजाणपणानें केसूकाकांना विचारलें.

" तो तर फारच मोठा इतिहास आहे ! " केसूकाका अधिक गंभीर आवाज करून म्हणाले, " म्हणजे त्याचें असें झालें कीं आबासाहेब वारले– "

" आबासाहेब ! " मी उद्गारलों.

" आपले थोरले शिवाजीमहाराज हो." जसे कांहीं शिवाजी-महाराज आपल्या वाड्यांतले कोणी एक बिऱ्हाडकरू आहेत अशा मामुली स्वरानें केसोपंत म्हणाले, " ते वारले, तेव्हां त्यांच्या पिंडाला कावळा शिवेना ! सगळ्याच त्यांच्या इच्छा अपुऱ्या राहिल्या ! " त्या दुःखद विचारानें केसोपंतांचा कंठ क्षण-भर भरून आल्यासारखा मला वाटला.

" अन् मग ! " मी अधीरपणें विचारलें.

" त्यावेळीं आमच्या या कोन्हेर भैराळानें आपल्या स्वामिनिष्ठेची शर्थ केली आणि एक कावळा जबरदस्तीनें पकडून आणून तो महाराजांच्या पिंडाला शिवविला!" बोलतां बोलता त्या पूर्वीच्या आठवणीनें केसोपंताच्या डोळ्यांत अश्रू चमकूं लागले

" आतां लक्ष्यांत आलं! तेव्हांपासून तुम्ही पिंगळयाचे कावळे झालांत!" गंगू अजून चहा घेऊन स्वयंपाकघरांतून बाहेर कशी येत नाहीं या विचारानें अस्वस्थ होऊन मी म्हणालों.

" हे सारं मी माझ्या इतिहासांत इत्थंभूत वर्णन केलेलें आहे." केसोपंत धोतराच्या टोकानें नाकपुड्या पुशीत म्हणाले.

" अन् हे डोमकावळे कोण?" कांहीं तरी बोलायचें म्हणून मी विचारलें.

" ते मूळचे कावळेच; म्हणजे आमच्याच भारद्वाज गोत्राचे. पण ते पुढें मोंगलाईत डोम या गावीं स्थायिक झाले. तेव्हांपासून त्यांचें आडनांव डोमकावळे पडलें." केसोपंत उत्तरलें.

" फारच मनोरंजक आहे एकंदरींत तुमचा हा सारा इतिहास!" गंगू चहाचा प्याला माझ्या हातांत देत असतांना तिच्या चेहऱ्याकडे रोखल्या दृष्टीनें पहात मी म्हणालों.

" महाराष्ट्रांत आजमितीस एकंदर आमचीं सदतीस कुटुंबें आहेत—"

कावळे कुटुंबाची खानेसुमारी सांगण्याच्या ऐन भरांत केसोपंत आले असतांना स्वयंपाक घरांतून स्नानासाठीं पाणी उपसऱ्याची कर्कश आरोळी आली, तसें तें प्रकरण तितक्यावरच सोडून केसोपंत घाईघाईनें स्नान करावयास निघून गेले आणि महाराष्ट्रांत

कावळे मंडळींचीं उणींपुरीं पन्नास कुटुंबें वसतांना देखील त्याचें जाहीर संमेलन भरवूं पहाणाऱ्या केसोपंतांच्या धाडसी कल्पकतेचें कौतुक करीत मीहि तेथून चालता झालों.

त्यानंतर महिना पंधरा दिवसांनीं एका सकाळच्या प्रहरीं केसोपंत माझ्याकडे अगदीं गडबडीनें आले. " एडिटरसाहेब, तुमच्याकडे काम आहे अगदीं जरूरीचें— "

कावळे संमेलनाची कल्पना मी या वेळेपर्यंत अजिबात विसरून गेलों होतों. म्हणून क्षणभर माझ्या डोक्यांत असाच विचार चमकून गेला कीं, गंगूच्या लग्नाची गोष्ट काढायसाठींच तर हा प्राणी माझ्याकडे आला नसेल ना ?

" आधीं बसा तर खरें काकासाहेब ! एवढी घाई कसली ! " मी माझी ' ब्रह्मचारी ' वळकटी गडबडीनें गुंडाळीत हसून म्हणालों. केसोपंतांनीं आपल्या खिशांतून बरेचसे कांहीं छापील कागद बाहेर काढले. " आमच्या संमेलनाचें आमंत्रण द्यायला आलों तुम्हांला— "

" तुमच्या संमेलनाचें ! " मी अचंब्यानें उद्गारलों.

" अहो, आमच्या कावळे कुटुंबीयांचें पहिलें जाहीर संमेलन भरणार आहे ना— "

तेव्हां कुठं माझ्या डोक्यांत प्रकाश पडला. " पण मला आमंत्रण काय म्हणून ? मी कांहीं कावळे नाहीं— " मी दांत विचकून जरा ' विनोद ' करीत म्हणालों.

" अहो, तुम्ही आम्हां कावळ्यापेक्षांही कावळे, म्हणजे एडिटर आहांत ना ! " केसोपंत माझ्या विनोदावर कडी करून म्हणाले,

" म्हणून तुम्हांला हें आमंत्रण. आमच्या संमेलनाचा रिपोर्ट नको का तुमच्या पत्रांत छापून यायला ? नाहीं तर आम्ही तुम्हाला कशाला बोलवतोय ! हें घ्या आमचें आमंत्रण कार्ड. पुढल्या रविवारीं भरणार आहे आमचं संमेलन. अध्यक्ष आहेत माळशिरसचे रावसाहेब खंडो बच्चाजी कावळे, रिटायर्ड पेन्शनर, मिलिटरी अकाउंट्स ऑफीस— "

" अन् तुम्ही स्वतः स्वागताध्यक्ष आहांत वाटतं ? अरे वा ! आणि या सौ अंबूताई कावळे म्हणजे— "

" आमची मंडळी हो ! म्हणजे our family ! केसोपंत थोडेसे लाजून म्हणाले, " ती तरी काय करणार ! तिला निवडली साऱ्या मंडळींनीं भगिनी संमेलनाची अध्यक्ष ! अन् आमची गंगू आहे त्या संमेलनाची चिटणीस ! '

त्याबरोबर माझ्या मनांत एक कल्पना आली. मी म्हणालों, " केसूकाका, तुमच्या गंगूचा एकादा फोटो असला तर द्या मला. मी तो आमच्या वर्तमानपत्रांत छापून तिच्याबद्दल फक्कडसा मजकूर देऊन टाकतों. तेवढंच आपलं— "

पण गंगूचा फोटो उपलब्ध नसल्याचें केसूकाकांनीं सांगितलें. ' मी तिला फोटोग्राफरकडे घेऊन जातों अन् तिचा एक फोटो काढवून आणतों ' असें केसूकाकांना सांगण्याचें माझ्या ओठावर आलें होतें, पण कां कोण जाणे, ते शब्द बोलायची माझी कांहीं छाती झाली नाहीं. चार दोन आमंत्रणपत्रिका आणि कांहीं कार्यक्रम पत्रिका वृत्तपत्रांतील माझ्या मित्रासाठीं ठेवून केसूकाका निघून गेले.

त्याच दिवशीं अकरा वाजतां जेवावयाला मी जसा खाणा-वळींत गेलों तशी केसोपंताच्या दारावर '**पहिले कावळे संमेलन : मुख्य कचेरी**' अशा मजकुराची तांबड्या शाईनें लिहिलेली एक पाटी लोंबत असलेली मी पाहिली. त्यावरून संमेलनाच्या कामाला खरोखरच सुरुवात झाली असल्याची माझी खात्री पटली. दुसऱ्या दिवशीं तर खुद्द आमच्या खाणावळीच्या दरवाजावर एक पाटी झळकायला लागली ! '**पहिले कावळे संमेलन. प्रतिनिधींसाठीं भोजनगृह**' आपल्या बिऱ्हाड-करू खाणावळीचा संमेलनासाठीं असा धूर्तपणानें उपयोग करून घेणाऱ्या केसोपंताच्या अक्कलेची जेवढी तारीफ करावी तेवढी थोडीच होती. एक दोन दिवसाचे आंत खाणावळींत तीन चार चमत्कारिक चेहेरे दिसूं लागले. त्यांची एकंदर 'सुरत' बघून ते कावळे संमेलनाचे बाहेरगांवाहून आलेले फुटकळ प्रतिनिधी असावेत हें ताडावयाला मला कांहीं फारसे प्रयास पडले नाहींत. एका संध्याकाळीं खाणावळींत काळे नांवाचे माझ्या जुन्या ओळ-खींचे एक फोटोग्राफर मोठमोठ्यानें भुरके मारीत जेवत असल्याचें मी पाहिलें. तेव्हां 'इकडे कोणीकडे ?' अशा अर्थानें मी त्यांना प्रथम दर्शनीच डोळ्यांनीं खुणावलें. तेव्हां "उद्यां आमचें संमेलन आहे ना !" असें त्यांनीं शेजारच्या कावळे प्रतिनिधींनीं मुद्दाम ऐकावें अशा थाटानें उत्तर दिलें.

मी चाट झालों. "अहो, तुम्ही तर—" मी विचारणार तोंच त्यांनीं मला थांबवून सांगितलें,"माझं आडनांव काळे नसून कावळे आहे. तुमच्याप्रमाणें बऱ्याच लोकांचा तसा गैरसमज आहे."

तथापि त्यामुळें माझ्या मनाचें कांहीं समाधान झालें नाहीं. मी पुन्हां कांहीं विचारणार तोंच काळयानें मला डोळा मारून ' मग सांगेन ' अशा अर्थानें खुणावलें.

खाणावळींतून बाहेर पडतां पडतां काळयानें माझ्या कानांत खरा खुलासा केला, " माझ्या आडनांवांत एका अक्षराची भर घालून जर मला या कावळे संमेलनाच्या फोटोचें दहाबारा रुपयांचें काम आणि दोन दिवस फुकट जेवण मिळतंय तर मी हा मोका कां दवडावा ? "

" म्हणजे, कावळे संमेलनाच्या फोटोचें काम दुसऱ्या आड-नांवाच्या माणसांना करतां येत नाहीं कीं काय ? " मी आश्चर्यानें विचारलें.

" मुळींच नाहीं ! हीच तर आजकाल भरणाऱ्या या कौटुंबीय संमेलनाची खरी गंमत आहे. ज्यांच्या या कावळे संमेलनाचें कोणतेंहि काम बिन-कावळयांना करतां यावयाचें नाहीं ! "

" मग कावळे संमेलनाचे हे चारदोन गणंग प्रतिनिधी तरी या काकूबाईच्या खानावळींत जेवायला कशाला ठेवलेत ! " मी जरा चिडून बोललों.

" म्हणजे, तुम्हांला माहीत नाहीं ? तुमच्या या काकूबाईचें आडनांव देखील कावळेच आहे ! " काळयानें माझ्या डोक्यावर दीडशें टनांचा एक बांबगोळाच भिरकावला ! क्षणभर माझ्या अगदीं ठिकऱ्या ठिकऱ्या होताहेत असें मला वाटलें.

" मला नव्हते माहीत ! " मी मरणाऱ्या माणसाच्या क्षीण आवाजांत म्हणालों.

"म्हणून तर केसोपंतांनीं तिच्या खाणावळीला आपल्या वाड्यांत जागा दिली मेहेरबान!" माझ्या पाठीवर रपाटा मारून खो खो हंसत काळे चालता झाला.

निजतां निजतां त्या रात्रीं मी मनाशीं विचार करीत होतो कीं उद्यां मी कावळे संमेलनाला बातमीदार म्हणून जाणार आहे, त्या अर्थीं आपल्या घराण्याचें मूळचें आडनांव कावळें बिवळें तर नसेल ना! हो काय सांगतां, निघायचें एखादें वेळीं!

दुसऱ्या दिवशीं सकाळीं साडेनऊ वाजतां कावळे संमेलनाची सुरुवात होणार होती. जागा तपकीर गल्लीमधील एका कोठल्याशा जुन्या अंधाऱ्या वाड्यांत मुक्रर केलेली होती. मी तेथें पोहोंचलों तेव्हां अंगणांत काळे-चुकलों-कावळे फोटोग्राफर सर्व प्रतिनिधींचा फोटो घेत होते. त्यावरून संमेलनाला एकंदर प्रतिनिधी किती आले असावेत हें एका दृष्टिक्षेपांतच मला कळून आलें. सारे मिळून एकंदर सदतीस प्रतिनिधी होते. त्यांत केसोपंतांचीं पांच, आणि इतरांचीं चार अशीं नऊ पोरें, सात भगिनी आणि उरलेले तेवीस पुरुष होते. भगिनींमध्यें केसोपंताच्या पत्नी सौ. अंबूताई, कन्या कु. गंगू आणि शंभर वर्षें आयुष्य आहे त्या काळ्याच्या बत्तीशीला खाणावळवाल्या गं भा. काकूबाई कावळे या प्रामुख्यानें चमकत होत्या. काकूबाईनें अंगावर आणि डोक्यावरून तांबडी भडक शालजोडी पांघरली असून त्या अध्यक्ष आणि स्वागताध्यक्ष यांच्या मधोमध आपल्या बोटांतली मोहरेची पिवळीधमक आंगठी प्रामुख्यानें दिसेल अशा पवित्र्यानें फोटो-साठीं बसलेल्या होत्या. त्या सदतीस प्रतिनिधींचे चेहरे आणि

कपडे बघून ते खरोखरच कावळे कुलोत्पन्न असावेत या विषयीं तरी माझ्या मनांत संशयच राहिला नाहीं. मात्र त्या साऱ्या मंडळींत कु. गंगू हीच काय ती तेवढी नाकाडोळयानें आणि रंगानें उजवी दिसत होती. किंवा तसें मला एकट्यालाच वाटत होतें कीं काय हें कांहीं मला सांगतां येत नाहीं.

जरीच्या टोप्या घातलेल्या केसोपंताच्या पांच चिरंजीवांनीं वाकड्या माना आणि चेहेरे करून मंगलाचरणाचीं पद्यें जोरदार आवाजांत म्हटलीं. केसोपंताचे चिरंजीव, जे फुरसंगीला स्टेशन मास्तर होते म्हणून मी मागें सांगितलें, त्यांनीं पद्यरचना केलेली होती. कु गंगू बाजाची पेटी वाजवून साथ करीत होती. त्या-नंतर स्वागताध्यक्ष केसोपंतांनीं आपलें भाषण खड्या आवाजांत वाचून दाखविलें. त्या भाषणांत शिवाजी महाराजांच्या काळा-पासूनचा कावळे घराण्याचा साद्यंत इतिहास त्यांनीं नमूद केलेला होता. मूळ संस्थापक कोन्हेर मैराळपासून तो गं. भा. काकूबाई खाणावळवाल्यापर्यंत त्यांनीं सर्व पराक्रमी कावळयांची मुक्तकंठानें स्तुति केलेली होती त्यानंतर आजमितीस हयात असणाऱ्या सर्व कावळे बंधुभगिनींची वयोवारीनें आणि धंदेवारीनें त्यांनीं खानेसुमारी केलेली होती. महाराष्ट्रामधील सगळ्या कावळे मंड-ळींची ( यांत डोमकावळेही आलेच ) एकंदर संख्या २१७ असून त्यांत ७५ पुरुष, ६९ स्त्रिया आणि ७३ पोरें ( मुलें आणि मुली ) होत्या. ७५ पुरुषांपैकीं ११ पेन्शनर ३० सरकारी नोकर, १० खाजगी नोकर आणि २४ बेकार होते. ६९ स्त्रियांपैकीं १० विधवा ४० विवाहित ( त्यांत ९ नवऱ्यांनीं टाकलेल्या ) आणि

१९ अविवाहित होत्या. स्त्रियांमध्यें दोन निमसरकारी नोकर ( यांत दोन महिन्याची बदली लागलेली गंगूही आलीच ) आणि १ ( म्हणजे गं. भा. काकुबाई ) व्यापार आणि बाकीच्या घर-काम करीत होत्या.

त्यानंतर रावसाहेब खंडेराव बच्चाची कावळे हे रीतसर अध्यक्ष-पदीं स्थानापन्न झाल्यानंतर बाहेरगांवाहून अनुपस्थित कावळ्यांचे आलेले यशश्चिंतनपर संदेश वाचून दाखविण्यांत आले. मग ‘ कावळे घराण्याचा संपूर्ण इतिहास ’ हा स्वागताध्यक्ष केसोपंत यांनीं लिहिलेला पाऊणशे पानांचा ग्रंथ आणि महाराष्ट्राचे नवो-दित कवि कुमार वसंत कावळे या कवीचा ‘ काव काव ’ हा स्फुट कवितांचा संग्रह अध्यक्षांच्या हस्तें प्रकाशित झाल्याचें जाहीर करण्यांत आलें. अध्यक्षांनीं आपल्या भाषणाच्या सुरवातीला आपण लो. टिळक यांचे कट्टर अनुयायी असल्याचें सांगितलें. नंतर आगगाड्या, तारायंत्रें, इस्पितळें वगैरे सुधारणा आणून इंग्रज सरकारनें या देशावर अत्यंत उपकार केले असल्याचें डोळ्यांत अश्रू आणून त्यांनीं सांगितलें. त्यानंतर प्रत्येक कावळे कुटुंबियानें चालू युद्धाला सहाय्य केलें पाहिजे, प्रत्येक कावळे तरुणानें विमान खात्यांत, जहाज खात्यांत, सैन्यांत जेथें जागा मिळले तेथें घुसून स्वराज्य मिळविण्यास मदत केली पाहिजे असें जोरदार शब्दांत त्यांनीं प्रतिपादन केलें. व्याख्यानाचे शेवटीं त्यांनीं प्रत्येक कावळे ‘ कुलदीपका ’ला बजावून सांगितलें कीं, “ प्रत्येकानें साष्टांग नमस्कार घालावेत, आपली प्रकृति उत्तम ठेवावी, आणि स्वधर्माचें पालन करावें ! एक वेळ स्वराज्य नाहीं

मिळालें तरी चालेल, पण स्वधर्माकडे जर दुर्लक्ष्य कराल तर तुम्हां आम्हां कावळ्यांच्या तोंडाला कायमची काळोखी लागेल! लक्षांत ठेवा." टाळ्यांच्या प्रचंड गजरांत अध्यक्षांचें भाषण संपलें.

त्यानंतर गीतापाठ आणि साष्टांग नमस्कार यांच्या सामन्यांत उच्च गुण मिळविण्याऱ्या कावळे मुलामुलींना अध्यक्षांच्या हस्तें बक्षिसें देण्यांत आलीं. बहुतेक बक्षिसें केसोपंतांच्या पोरांनींच उपटलेलीं दिसत होतीं. नंतर ठरावाच्या कार्यक्रमाला सुरुवात झाली. पहिला ठराव गेल्या वर्षी वारलेल्या कांहीं कावळ्यांच्या मृत्यूबद्दल दुःख प्रदर्शन करण्याचा होता. दोन मिनिटें उभे राहून सभेनें तो ठराव रीतसीर पास केला आणि सारे सभासद स्थानापन्न झाले नाहीं तोंच केसोपंताच्या सौभाग्यवतींना दोन महिन्यांपूर्वी वारलेल्या आपल्या दीड वर्षाच्या मुलीची आठवण झाली. ठरावांत तिचें नांव चुकून आलेलें नव्हतें. तेव्हां तिच्या अकालीं निधनाबद्दल दुःख व्यक्त करण्यासाठीं साऱ्या सभेला फिरून एकवार उठून उभें रहावें लागलें. तदनंतर तुरुंगांत खितपत पडलेल्या देशांच्या पुढाऱ्यांची सरकारनें ताबडतोब सुटका करावी असा 'राजकीय' ठराव एका खादी वेषधारी कावळ्यानें सभेपुढें मांडला. पण देशाच्या पुढाऱ्यांचा आणि प्रस्तुत कावळे संमेलनाचा कांहीं एक संबंध नाहीं या कायदेशीर मुद्यावर अध्यक्षानें तो ठराव नियमबाह्य ठरविला. त्यामुळें सभेंत बरीच खळबळ माजली. तेव्हां कॉंग्रेसच्या चळवळींत शिक्षा झालेला कावळे नांवाचा तरुण येरवड्याच्या तुरुंगांत खितपत

पडलेला आहे त्याची तरी सरकारनें विनाविलंब सुटका करावी, असा ठराव अध्यक्षांनीं खुर्चीवरून स्वतः जेव्हां मांडला तेव्हां टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला आणि सभेंतील गरम वातावरण एकदम शांत झालें.

वऱ्हाड नागपूरचे एक कार्यकर्ते दे. भ. बाबाराव कावळे यांनीं नंतर असा एक ठराव मांडला कीं काँग्रेस आणि लीग यांचा लौकरच जो समझौता होणार आहे तो या कावळे संमेलनाला बिलकूल मंजूर नाहीं. किंबहुना या संमेलनाच्या अध्यक्षांना विचारल्यावांचून ब्रिटिश सरकार जर एकादी स्वराज्याची योजना तयार करील तर प्रत्येक कावळे कुलोत्पन्न माणूस तिला शक्य तर सशस्त्र विरोध केल्याविना राहणार नाहीं. या ठरावाला गं. भा. काकूबाई यांनीं भगिनी वर्गातर्फे जोरदारपाठिंबा दिला, तेव्हां ठराव प्रचंड बहुमतानें मंजूर झाला. कस्तुरबा फंडाला संमेलनातर्फे मदत करण्याचा ठराव बहुमतानें फेटाळण्यांत आल्यावर कावळे कुटुंबीय मुलांमुलींना शिक्षण देण्यासाठींएक लाख रुपयांचा निधी ताबडतोब उभारण्याची योजना स्वागताध्यक्ष केसोपंतांनीं स्वतः संमेलनापुढें मांडली. एक लाख रुपयांऐवजी सदर निधी एक हजार रुपयांचा असावा अशी उपसूचना हळूच कोणीतरी चावटपणानें सुचविली. ती अर्थातच नामंजूर झाली आणि लक्षनिधीचा ठराव एकमतानें मंजूर झाला. किंबहुना निधीसाठीं पांचपन्नास रुपयाचे आकडे देखील त्याचक्षणाला खडाखड जाहीर झाले. त्यामुळें शिक्षणनिधी हजाररुपयांचा असावा अशी वात्रट उपसूचना पाठविणाऱ्या कावळ्याचें तोंड अगदीं

चिमणीएवढें होऊन गेलें ! त्यानंतर कावळे मंडळी-साठीं एक स्वतंत्र त्रैमासिक, एक वाणसौद्याचें दुकान, एक स्टोर्स, एक मंगल कार्यालय आणि एक मर्तिकाच्या सामानाचें दुकान काढण्याचे निरनिराळे ठराव संमेलनानें बिनविरोध मंजूर केले. त्यानंतर वेळ बराच झाल्यामुळें भोजनासाठीं संमेलनाचें काम कांहीं काळ स्थगित करण्यांत आलें.

अध्यक्षांची स्वाक्षरी घेण्यासाठीं बाळगोपाळ मंडळी त्यांच्या खुर्चीभोंवती जमा झाली. स्वाक्षरी देतांना 'कावळ्यानें कावळ्या-सच मदत करावी ! ' असा तेजस्वी संदेश अध्यक्षांनीं प्रत्येकाला दिला भोजनाला थोडासा अवकाश होता तेवढ्या वेळांत भगिनी संमेलन उरकून घेण्याची कल्पना कोणी तरी सुचविली. ती अध्यक्ष सौ. अंबूताई कावळे यांनीं मान्य करून भगिनी संमेलनाचें काम त्याच ठिकाणीं ताबडतोब सुरू केलें. या बैठकीचे वेळीं एकटा मी वजा करून बाकीच्या पुरुष मंडळींना सभागृहांतून हाकून देण्याचें काम गं. भा. काकूबाई यांनीं कमरेला आडवा पदर लावून मोठ्या वीरश्रीनें केलें. अध्यक्ष सौ. अंबूताई यांनीं दोन वाक्यांतच आपलें अध्यक्षीय भाषण संपविलें. त्या म्हणाल्या " मघाशीं 'तिकडून' आणि अध्यक्ष रावसाहेब यांनीं जीं भाषणें केलीं त्यापेक्षां निराळें असें मी तुम्हांला काय सांगणार ? तेव्हां त्यांनीं जें जें सांगितलें त्याला माझा संपूर्ण पाठिंबा आहे. एवढें सांगून मी खालीं बसतें ! " त्यानंतर दोन तीन ठराव सभेपुढें आले. कावळे कुळांतल्या बायकांनीं बिनकासोट्याचें नेसूं नये. पेडाच्या वेण्या घालव्यात, डोक्यावरून पदर घेत जावा, चांगलें

रुपयाएवढें कुंकू लावावें, रस्त्यानें अनवाणीं पायांनीं जावें, अशा अर्थाचे ते ठराव होते. कुंकवाच्या ठरावावर गं. भा. काकूबाई यांनीं तर अंगविक्षेप करुन ठणठणीत भाषण केले ! त्या म्हणाल्या, "हल्लींच्या पोरी टाचण्याच्या टोकांनीं कुंकू लावतात ! त्यामुळें त्या कुंवारणी आहेत, लग्नाच्या आहेत, विधवा आहेत का मेल्या बाजारबसव्या आहेत हेंच मुळीं कळत नाहीं ! माझें जेव्हां इकडचें हें असें झालें नव्हतें, तेव्हां माझ्या इकडचें हें असें झालें नव्हतें, तेव्हां माझ्या कपाळाचें कुंकू दोन मैलावरुन दिसत असे, समजलात ! विचारा अध्यक्षीणबाईंच्या यजमानांना !' हें वाक्य बोलतांना काकूबाई अशा कांहीं पवित्र्यांत उभ्या राहिल्या होत्या कीं, रिपोर्ट लिहितां लिहितां मी देखील तोंडांत पेन्सिलीसकट बोट घातलें ! ठरावांचें काम संपल्यानंतर भगिनीसंमेलनाची चिटणीस कु. गंगू कावळे हिनें लाठी फिरवण्याचा कार्यक्रम करून दाखविला.

रस्त्यावर जर कोणी आपला विनयभंग करण्याचा प्रयत्न केला तर कावळे कुळांतील स्त्रियांनीं आपलें संरक्षण कसें करावें ह्याचें कु. गंगूनें तें जवळ जवळ वीरश्रीयुक्त प्रात्याक्षिकच दिलें म्हणानात ! त्यावेळीं गंगूचा चेहरा मला इतका आवेशयुक्त आणि मर्दानी दिसला कीं क्षणभर माझ्या छातींत धडकीच भरली ! हें प्रकरण वाटतें तितकें कांहीं सोपें नाहीं असें मी स्वतःशींच मनांतल्या मनांत भीत भीत पुटपुटलों.

एवढें झाल्यानंतर जमलेल्या भगिनींना हळदीकुंकू देऊन भगिनी संमेलनाचा समारोप करण्यांत आला.

मी 'कावळे' नसल्यानें संमेलनाच्या मुख्य भोजनांत भाग घेण्याचें वस्तुतः मला कांहींच कारण नव्हतें. पण केसोपंतानें विशेष आग्रह केल्यावरून मी मुख्य पंक्तीला काटकोन करून जेवावयाला बसलों. आणि शिवाय वाढण्याचें काम कु. गंगू ही धुढाकार घेऊन करीत होती. तेव्हां जेवणांतलें एवढें जबरदस्त आकर्षण टाळण्याइतकें मनोधैर्य माझ्यांत खासच नव्हतें ! बाकी खरें सांगायचें म्हणजे संमेलनाच्या सुरुवातीपासून कु. गंगू कावळे इथें ना तिथें अशी एकसारखी माझ्या डोळ्यासमोर नाचत होती म्हणूनच कावळे संमेलनाच्या त्या भयंकर कार्यक्रमामधें मी कसा तरी तग धरून शिल्लक उरलों होतों. ती नसती तर—पण नकोच तो भीषण विचार !

भोजनोत्तर पैठणचे सुप्रसिद्ध कीर्तनकार ह. भ. प. गंगूनाना कावळे यांचें तासभर कीर्तन झालें. त्यानंतर मास्टर गिलोबा कावळे यांच्या नकला, प्रो. के. के. कावळे यांचें जादूचे प्रयोग इत्यादि कार्यक्रम होऊन ' कावळे घराण्याचा साद्यंत इतिहास ' लिहिण्याचें अपूर्व कार्य केल्याबद्दल स्वागताध्यक्ष केसोपंत कावळ्यांचा संमेलनानें जाहीर सत्कार केला. चांदीची एक दौत आणि टांक त्यांना देण्यांत आला. त्यानंतर पुढील कावळे संमेलन फुरसुंगीला बोलावण्याचा ठराव तेथील स्टेशनमास्तर श्री. नरहरि केसो कावळे यांनीं मांडला. तो पास झाल्यावर अध्यक्षांनीं समारोपाचें भाषण केलें. पुढील वर्षी लाख रुपयांचा 'कावळे शिक्षण निधी' जमविण्यासाठीं स्वतः महाराष्ट्रांत दौरा काढण्याचें त्यांनीं कळकळीचें आश्वासन दिलें आणि त्या दौऱ्याच्या

खर्चासाठीं एक हजार रुपये मात्र सर्वांनी मंजूर करावेत अशी संमेलनाला त्यांनीं हात जोडून विनंती केली.

त्या नंतर आभार मानण्यासाठीं कु. गंगू कावळे ही उभी राहिली. आतां ‘आपल्या’ गंगूचें वक्तव्य आपल्याला ऐकायला मिळणार या विचारानें तळपायापासून डोक्यापर्यंत माझ्या अंगावर गोड शहारा उठला. पण ती अशा कांहीं आवेशानें आणि अविर्भावानें सभेपुढे आली कीं हातांतली पेन्सिल टेबलावर ठेवून भयकातर मनाने मी तिच्याकडे टकटका पहातच राहिलों! मला वाटलें कीं ही पोरगी अध्यक्षाला एक थप्पड लगवायला तर आली नाहीं? दात ओठ चावीत आणि डोळे गरगरा फिरवीत श्रोत्यांकडे एक वेळ तिनें पाहिलें आणि ती एकदम किंचाळली, “बंधू भगिनींनो, आज सकाळपासून आपल्या कावळे कुळांचें हें अद्वितीय संमेलन पाहून माझ्या मनावर भयंकर—अतिशय भयंपरिणाम झालेला आहे! आणि म्हणून मी आपणां सर्वांसमोर अशी जाहीर प्रतिज्ञा करते—”

सारे प्राण कानांत एकवटून मी ऐकूं लागलों. म्हटलें आतां ही ‘आमची बाई’ काय भयंकर प्रतिज्ञा करते आहे कोणास ठाऊक!

“— मी-मी अशी प्रतिज्ञा करते कीं आपल्या कावळे कुटुंबियांची सेवा करण्यासाठीं मी—कु. गंगू कावळे—आजच्या स्वागताध्यक्षांच्या पोटीं नशिबानें जन्माला आलेली ही कावळे-कुल-कन्यका अशी प्रतिज्ञा करते कीं **मी आजन्म अविवाहित रहाणार!**—”

—पुढें काय झालें तें मला आठवत नाहीं! कांहीं तरी धुडुम

—धाड धुडुम—धाड असें वाजलें आणि माझ्या भोंवतालीं एकदम गडद काळोख पसरला !

त्या काळ्याकभिन्न मूर्च्छनेमध्यें मी किती वेळ पडलो होतों तें कांहीं मला आठवत नाहीं. एवढेंच फक्त आठवतें कीं कु. गंगू ही झांशीच्या लक्ष्मीबाईप्रमाणें हातांत तलवार घेऊन पुण्याच्या कसबा पेठेमधून नाचत गर्जत चाललेली आहे आणि भोंवताली हजारों कावळ्यांच्या झुंडी काव काव करून उडत आहेत !

त्यानंतर पुन्हां मी जेव्हां डोळे उघडले तेव्हां ताराचंद रामनाथ धर्मार्थ रुग्णालयामधील एका लहानशा खोलीमधील खाटेवर मी निपचित पडलों असल्याचें मला आढळून आलें. मी तेथें कां आलों, कसा आलों, कधीं आलों यापैकीं कांहीं एक मला आठवत नव्हतें. किलकिले डोळे करून मी आजूबाजूला पाहूं लागलों. आणि मनांतल्या मनांत विचार करूं लागलों. दुपारचा दोनचा सुमार होता. बाहेर कडक उन्ह पडलेलें होतें.

इतक्यांत बाहेरून कावळ्यांची कर्कश कावकाव कानांवर पडली. आणि एका क्षणांत माझ्या डोक्यांत प्रकाश पडला ! तेंच तें—

"कावळे कावळे—हाकून द्या त्यांना !" कानावर हात ठेवून मी मोठ्यानें ओरडलों आणि गप्पकन् डोळे मिटून घेतले !



# मास्तर आणि पोलिस ३

" टुमणे "—

हेडमास्तरांच्या हापिसांत टुमणे मास्तरांनीं भीत भीत पाय टाकतांच, नाकाच्या शेंड्यावर सरकलेल्या आपल्या चष्म्यावरून तिरप्या नजरेनें त्यांच्याकडे पाहात हेडमास्तर गरजले. शेजारीं देशपांडे कारकून शक्य तेवढा निर्विकार चेहेरा करून उभे होते. त्यांच्या डाव्या डोळ्यांत फूल पडलेलें असल्यानें ते कुणाकडे बघत असावेत हें कळणें कठीण होतें. तथापि त्यांचा एक डोळा हेडमास्तरांच्या टेबलावर पडलेल्या एका कॅटलागावर आणि एका लांबोड्या वहीवर असावा असें टुमणे मास्तरांनीं एका क्षणांत ताडलें.

चिंतो बाळाजी टुमणे, पी. ई, एस. टी सी.( भाग पहिला ) हे त्या शाळेंत गेलीं अठरा वर्षें शिक्षक होते. आणि अकरा वर्षें ' इयत्ता दुसरी, तुकडी ड ' चे ' क्लासटीचर ' होते तथापि हेडमास्तरांच्या खोलींत पाऊल टाकण्याचा त्यांचा हा तिसरा का

चौथा प्रसंग होता. पहिल्यानें नोकरीचा अर्ज घेऊन आले त्या वेळीं, दुसऱ्यान्दा लग्नासाठीं दोन दिवसाची रजा पहिजे होती त्यावेळीं, तिसऱ्यान्दा बायको वारली तेव्हां अर्ध्या दिवसाची रजा मागण्यासाठीं आणि चौथ्यान्दा–हो बरोबर, चौथ्यान्दा हें आतां—

पांचव्या तासाचा टोला वाजतो न वाजतो तोंच शंकर गडी नेहमींच्या उर्मट घाईनें वर्गाच्या दारांत अर्धवट पाऊल टाकून आणि अंगठा हपिसाच्या दिशेकडे उडवून बसक्या आवाजांत ओरडला " मास्तर, साहेब बोलावत्यात –" त्याच वेळीं टुमणे मास्तरांच्या छातींत धसका बसला. हेडमास्तरांनीं त्यांना होऊन आपल्या हपिसात बोलावण्याची अशी ही पहिलीच वेळ ! एक क्षणभर त्यांच्या डोळ्यासमोर कांहीं तरी चमकल्यासारखें झालें. तथापि, हेडमास्तरांनीं आपल्याला कां बोलावलें असावें याबद्दलचा एकादा विचार डोक्यांत सुचावयाच्या आधींच, त्यांचें वाळकें शरीर खुर्चीवरून तटकन् आपोआप उठलें आणि हेडमास्तरांच्या हपिसाकडे आपलें चालूं लागलें. हेडमास्तरांच्या खोलींत पाऊल टाकायच्या पूर्वीं एक क्षण अर्धा क्षण ते बाहेर थबकले आणि डोळे मिटून स्वतःशींच कांहीं तरी पुटपुटले—

" टुमणे—" टुमणे मास्तरांचा गांगरलेला चेहेरा पहातांच हेडमास्तरांच्या आवाजाचा सूर आणखीच चढला.

" यस सर !—" सुकलेल्या ओठावरून जीभ फिरवीत कांपऱ्या स्वरांत टुमणे गुणगुणले. हेडमास्तरांच्या डोळ्याला डोळा देण्याची त्यांची छातीच नव्हती. ते देशपांडे कारकुनाच्या कपाळावरील

आवाळूकडे असहायपणें बघू लागले. इतक्यांत घड्याळांत ‘ टर्र टर्र—’ असा आवाज होऊन साडेचाराचा एक ठोका पडला. टुमणे मास्तरांच्या काळजांत क्षणैक धसका बसल्या-सारखेंच झाले.

“ गेल्या महिन्याच्या तुमच्या फीच्या हिशेबांत पांच रुपये दोन आणे कमी पडताहेत. ” हेडमास्तर टेबलावर पडलेल्या कॅटलागावर हात आपटीत म्हणाले.

टुमणे मास्तरांना आपल्या काळजांतला एकादा भाग खटकन् तुटल्यासारखा आंतून ऐकूं आला. फीच्या हिशोबांतले पांच रुपये दोन आणे कमी ! बाप रे ! अर्धवट तोंड उघडून ते देशपांडे कारकुनाकडे बघूं लागले. पण देशपांडे कारकुनांचा चेहरा आतां पूर्वीपेक्षां अधिक मख्ख झाला. तोंडांत कांहींही नसतांना सुपारीचा चोथा चघळल्याप्रमाणें ते गाल चाळवीत समोरच्या भिंतीवरील कॅलेंडराकडे बघत होते.

“ साऱ्या बेरजा मी तपासून पाहिल्यात तुमच्या. दोन मुलांची फीच मुळीं तुम्ही जमा केली नाहीं पावती बुकांत. ” हेडमास्तर टेबलावरचें पावती बुक हसडून म्हणाले.

“ असं व्हायचं नाहीं—” टुमणे मास्तरांच्या तोंडून शब्द उमटले एकदाचे.

“ व्हायचं नाहीं ? ” देशपाडे कारकुनाकडे रुजवातीच्या नजरेनें पहात हेडमास्तर रागानें ओरडले. देशपांडे क रकुनांच्या डोळ्यांतील पांढरें फूल अधिकच उमलल्यासारखें दिसलें.

“ पण साहेब अठरा वर्षं काम करतोंय मी इथं—” टुमणे

मास्तर कानामागें खाजवल्यासारखा हात ठेऊन रडक्या आवाजानें म्हणाले.

" सत्तावीस वर्षे पांच महिने चार दिवस नोकरी झाली आहे माझी या शाळेंत साहेब ! " प्रत्येक शब्दाचा स्पष्ट उच्चार करीत खणखणीत आवाजांत देशपांडेकारकून म्हणाले.

" हे पहा मिस्टर टुमणे, तुम्हांला या शाळेंत नोकरी करायची आहे का जायचंय—" बोलतां बोलतां येरवड्याच्या तुरंगाच्या दिशेकडे हेडमास्तरांनीं मान उडविली !

" नाहीं–नाहीं–साहेब—" टुमणे मास्तर दांत विचकून दुबळ्या आवाजांत किंचाळले.

" मग उद्यां अकराच्या आंत पांच रुपये दोन आण्याचा भरणा करून हिशेब पुरा करा अन् यांची सही घ्या " हेडमास्तर टेबलावर हात आपटून म्हणाले.

" साहेब, आपणच ती घेतलेली बरी ! " टेबलावरचा कॅटलाग आणि पावती पुस्तक चटकन् उचलतां उचलतां देशपांडे कारकून लोचट चेहरा करून पुटपुटले.

" अकरा वाजून दहा मिनिटाच्या आंत पैशाचा भरणा झाला नाहीं तर—" हेडमास्तर घोगऱ्या आवाजांत गुरगुरले.

पण त्यांचे पुढचे शब्द टुमणे मास्तरांना ऐकूच आले नाहींत. एकदम त्यांच्या डोळ्यांसमोर अंधारी आली. आणि घशांत त्यांना गुदमरल्यासारखें झालें. हेडमास्तराच्या खोलींतून आपण आपल्या वर्गात कसें आलों हेंच त्यांना कळेना.

शेवटचा तास ड्रिलचा होता. त्यामुळें वर्गात कोणीच नव्हतें.

सुट्टीची घंटा होईपर्यंत ते तसेंच आपल्या खुर्चीवर डोळे मिटून स्वस्थ बसले. त्यांच्या डोक्यांमधून ब्रह्मांड फिरत होतें. बायको वारली त्यावेळीं देखील त्यांचें मस्तक इतकें सुन्न झालें नव्हतें. फीचे पैसे खाल्ल्याचा आरोप आणि आपल्यावर यावा ? अरेरे, अशी बेअब्रू जगात होण्यापेक्षां दोन आण्याची अफू खाऊन मेलेलें काय वाईट ! नकळत त्यांचा हात जाकिटाच्या वरच्या खिशात गेला. तो दोन आण्याचें चौकोनी नाणेंच त्यांच्या बोटाला लागलें. विंचू डसावा तसा त्यांनीं हात बाहेर काढला.

इतक्यांत सुटीची घंटा झाली. इतकी कर्कश घंटा गेल्या अठरा वर्षांत त्यांनीं ऐकली नव्हती. किती वेळ तरी सारखी वाजतच होती ती ! फळ्याच्या मागें टांगलेली छत्री घ्यावयाची विसरून टुमणे मास्तर तसेंच वर्गाच्या बाहेर पडणाऱ्या पोरांच्या झुंडीमधून धक्के खात कसे रस्त्यांवर आले असतील हें त्याचे त्यांनाच ठाऊक. किती वेळ तरी ते रस्त्यांतून चालले होते. समोरून येणाऱ्या दोन चार माणसांनीं त्यांना धक्के दिले. मागून येणाऱ्या एक दोन टांगेवाल्यांनीं त्यांना भलत्याच कांहीं तरी शिव्या दिल्या. पण त्याची त्यांना शुद्ध कुठं होती ? ते चालत होते का रस्ता त्यांच्या पायाखालून सरकत होता,याचाच त्यांना भ्रम पडला होता.

उद्यां अकराच्या आंत पांच रुपये दोन आणे भरायचे कसे ? हा एकच विचार त्यांच्या डोक्यांत थैमान घालून राहिला होता. त्यांना महिन्याचा बत्तीस रुपये तेरा आणे पगार होता. महिना संपून चार दिवस झाले होते आणि पगाराला दोन तीन दिवस अवकाश होता. आणि खिशांत तर अवघे दोन आणे शिल्लक होते.

दुसऱ्याकडून पैसे उसने मागून आणण्याची टुमणे मास्तरांची छातीच नव्हती. दुसऱ्याला उसने दिलेले चार आठ आणे परत मागण्याचें त्यांना कधीं धैर्य होत नसे, तर दुसऱ्याकडून उसनवार पैसे मागण्याची गोष्ट कशाला? स्वतःच्या लग्नांत ठरलेल्या दोनशें रुपयांच्या हुंड्याला देखील त्यांना याच स्वभावामुळें मुकावें लागलेलें होतें. मग काय तर?

हेडमास्तरांचा स्वभाव त्यांना माहित होता. अकरा वाजतां आपण देशपांडे कारकुनाकडे पैशाचा भरणा केला नाहीं तर अकरा वाजून दहा मिनिटांनीं तो खविस आपल्याला पोलिसाच्या—पोलीस? अरे बापरे! पोलिसाची आठवण होतांच टुमणे मास्तरांच्या सर्वांगाला कापरें सुटलें. उद्यां अकरा वाजून वीस मिनिटांनीं एक पोलीस शाळेत येतो आहे आणि तो आपल्या वर्गांत शिरून आपल्या मुलांदेखत आपल्या हातांत बेड्या अडकवित आहे. वर्गांतलीं कांहीं मुलें रडत आहेत. कांहीं मुलें हंसत आहेत. देशपांडे कारकून आपला 'फुलवाला' डोळा चमकावीत वर्गाच्या दाराशीं उभे आहेत—

आपणाला पकडून नेलें तर शाळेला सुट्टी मिळेल काय असा एक ओझरता विचार सहज टुमणे मास्तरांच्या डोक्यांत चमकून गेला.

दुसरे दिवशीं सकाळीं 'ज्ञानप्रकाशांत' छापून आलेला आपल्या गुन्ह्याचा ठळक मथळा देखील टुमणे मास्तरांच्या डोळ्यापुढें दिसूं लागला.

"अफरातफरीसाठीं एका दुय्यम शिक्षकाला अटक—"

चालता चालता ढुमणे मास्तर एकदम थांबले आणि त्यांनीं आपले डोळे गप्पकन् मिटून घेतले.

इतक्यांत 'मास्तर' म्हणून मागून एक हांक आली. ढुमणे मास्तरानीं दचकून डोळे उघडले आणि मागें वळून पाहिलें तों-

एक पोलीसच त्यांना हांक मारतोय ?

" मास्तर--मास्तर—"

पोलीस ! आणि आपल्याला हाक मारतोय ? म्हणजे तेंच तें ! ढुमणे मास्तरांना आता विचार करायला देखील वेळ नव्हता. ज्या संकटाचें त्याना नुसतें भय वाटत होतें तें संकट प्रत्यक्ष चालूनच आलें म्हणायचें ! काय नीच असला पाहिजे हा हेडमास्तर ! उद्या अकरा वाजून दहा मिनिटें होईपर्यंत देखील त्याला दम निघाला नाहीं ना ?

पोलिसाची हाक ऐकल्या न ऐकल्या सारखें करून ढुमणे मास्तरांनीं मान फिरवली आणि लांब लांब टांगा टाकीत ते अशा झपाट्यानें निघाले म्हणता ! आतां ते चांगलेच शुद्धीवर आले होते. पोलिसांनीं रस्त्यावर पकडून आपली साऱ्या जगासमोर शोभा करायच्या आधीं आपण घरीं कसें पोहोंचूं याचीच काय ती त्यांना आतां विवंचना होती.

पण कदाचित् तो पोलिस आपल्याला हांक मारीत नसून दुसऱ्याला मारीत असेल तर ! ढुमणे मास्तरांना सहज शंका आली.

तोंच " ढुमणे मास्तर-अहो ढुमणे मास्तर ! " अशी मागाहून हांक आली. मागून पाठींत चांगला एकादा अणकुचीदार दगड बसावा तसें ढुमणे मास्तरांना वाटलें आणि त्या वेदनेच्या

कल्पनेनें त्यांनीं गपकन् डोळेच मिटले. आतां मुळीं शंकाच राहिली नाहीं ! हेडमास्तरांनीं आपलें नांव देखील पोलिस चौकीवर कळवलें आहे अं ? मागून आलेली हांक आपल्याला जणुं काय ऐकूंच आली नाहीं असा निर्ढावलेला चेहरा करून टुमणे मास्तर तसेंच जोरानें पुढें चालू लागले. चालू कसलें ? आता चांगले पळूंच लागले ! उभ्या जन्मात भर रस्यावरून पळायचा टुमणे मास्तरांचा तो पहिलाच प्रसंग होता.

" मास्तर–मास्तर, पळतां काय–थांबा ! " मागून टुमणे-मास्तरांना पोलिसाची आरोळी ऐकूं आली.

पण टुमणेमास्तर काय थांबताहेत ? आतां त्यांचें घर कांहीं लांब नव्हतें. अंगांत होतें नव्हतें तेवढें बळ एकवटून त्यांनीं पुन्हां जोराची सुरकांडी मारली.

पण त्या गडबडींत पायाखालील एक खड्डा कांहीं त्यांना दिसला नाहीं. बोलून चालून पुण्याचाच रस्ता तो !

" अग आई ग ! " एवढेंच शब्द ठेंचाळून खालीं पडतां पडतां त्यांच्या तोंडून निघाले.

त्यानंतर पुढें काय झालें हें त्यांना कळलेंच नाहीं. पुन्हा कांहीं वेळानें त्यांनीं डोळे उघडलें तेव्हां तो पोलीस डोक्यावर पाणी शिंपडून आपल्याला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न करतो आहे असें दृश्य त्यांच्या डोळ्यांना दिसलें.

टुमणे मास्तरांच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. पोलीसाचे पाय घट्ट पकडून आणि डोळ्यांत अश्रू आणून ते म्हणालें "नाहीं

पोलीससाहेब, खरंच सांगतों-मी नाहीं खाल्ले फीचे पैसे ! मी निरपराधी आहे ! ”

टुमणे मास्तराचे ते शब्द ऐकून तो पोलीस खदखदां हंसू लागला, “ टुमणे मास्तर, मला ओळखलें नाहीं तुम्हीं ! अहो, मी गणू महादू मोरे, दहा वर्षांपूर्वी मी तुमच्या वर्गांत नव्हतों कां आपल्या दुसरी ‘ क ’ मध्यें ! ”

टुमणे मास्तरांची एकदम दांतखिळीच बसली ! त्यांना आपण स्वप्नांत आहोंत का जागे आहोंत हेंच कळेना.

“ तुम्ही आम्हांला इतिहास शिकवायचे अन्–शिवाजी महाराजांच्या पराक्रमाच्या गोष्टी सांगायचे. अजून आठवतय् मला तुमचे तें शिकविणें. अहो, आपल्या आशीर्वादानें तर मी जमादाराच्या हुद्यापर्यंत पोहोंचलों आहे–चांगलं चाललं आहे माझं—”

जमादार मोऱ्याच्या राठ मिशामधून दहा वर्षांपूर्वीच्या गणू महादू मोऱ्याचा बिनमिशाचा कोवळा चेहरा टुमणे मास्तरांना आतां अंधुक अंधुक आठवूं लागला.

“म्हणजे मी गणिताची शिकवणी देत होतो तुला नाहीं का–”

“बरोबर ! तोच मी ! त्या वेळचे तुमचे शिकवणीचे पांच रुपये राहिलेले तुम्हांला आतां आठवत नसतील पण मला अजून आठवताहेत ! ” गणू खिशांतून पांच रुपयांची नोट काढून म्हणाला.

“ हे पैसे कधीं तरी समक्ष भेटून तुम्हांला द्यावेत म्हणून इथें बदली होऊन आल्यापासून मी ठरवून ठेवलें होतें. पण आमच्या या कामामुळें वेळ कुठं मिळतोय. तों आज तुम्ही वाटेंत अचानक

भेटलांत !" असें म्हणून ती पांच रुपायांची नोट जमादारानें मोठ्या प्रेमानें ठुमणे मास्तरांच्या जाकिटाच्या खिशांत कोंबली.

गणूच्या चेहेऱ्याकडे भकास मुद्रेनें बघतां बघतां ठुमणे मास्तर एकदम हसूं लागले. मोठमोठ्यानें हसूं लागले. अगदीं चमत्कारिक तऱ्हेनें हसूं लागले. ते कां हंसताहेत हे गणूला कळेना. ठुमणे मास्तरांना असें हंसतांना त्यानें पूर्वी कधीं पाहिलें नव्हतें ! हसतां हसतां मास्तर एकदम थांबले. त्यांनीं गणूचा हात घट्ट आवळून धरला. गणू त्यांच्या चेहेऱ्याकडे चकित होऊन बघूं लागला. ठुमणे मास्तरांच्या डोळ्यांतून घळघळ अश्रूंचे ओघळ वहात होते.



# बारा आण्याला घोडें ४

मी लहान होतों. असेन दहा बारा वर्षांचा. खेडेगांवच्या इंग्रजी शाळेंत दुसऱ्या इयत्तेंत शिकत होतों मी.

आमच्या गांवापासून दोन मैलांवर माझें आजोळ होतें. आजोळ म्हणजे आईचें माहेर हें सांगायला नकोच. आजोळीं आईचे थोरले भाऊ म्हणजे माझे मामा रहात असत. मामांची उमर काय असेल त्यावेळीं कोणास ठाऊक. त्यांच्या मिशा आणि केस मात्र पार पिकून गेले होते. त्यामुळें मला ते आपले म्हातारेच वाटत असत! लहान मुलाला सगळींच मोठीं माणसें म्हातारीच वाटतात नाहीं का? मामा अंगानें हाडकुळे असले तरी त्यांचा चेहरा मोठा तजेलदार असे. कपाळभर फासलेलें त्यांचें तें दोन बोटी पांढरें गंध आणि त्यांच्या दोन भुंवयांमधला तो शेंदराचा ठळक टिळा बघून कोणालाही त्यांच्याबद्दल आदरच वाटत असे.

मामा आपल्या गांवीं असे फारच थोडे रहात. त्यांचा बहुतेक मुक्काम आमच्याच गांवीं म्हणजे आमच्याच घरीं असे. त्यांचे

कारण असें कीं माझे वडील असत फाळणी खात्यांत नोकरीला. त्यामुळें वर्षांतून दहा महिने ते फिरतीवरच असत. वडिल बाहेर गांवीं असले कीं मामांचा मुक्काम आमच्या घरीं असायचाच म्हणून समजा. अन् वडील फिरतीवरून घरीं परत यायच्या आधल्याच संध्याकाळीं मामा आपल्या गांवीं हमखास पसार झालेले असायचे !

मामाचें अन् माझ्या वडीलांचें काय बिघडलें होतें कोणास ठाउक !

पण कांहीं तरी बिघडलें होतें खास ! मामा माझ्या वडीलांसंबंधीं फारसे बोलत नसत. पण कधीं बोलायचे तेव्हां मात्र चांगले बोलत नसत. " मूर्ख आहे तुझा बाप ! " मामा विडीचा झुरका घेत मला कधीं कधीं म्हणायचे, "माझें त्यानें ऐकलें असतें तर आज तो मामलेदार असता या गांवीं ! असा बारा रुपड्यावर भटकत नसता फिरला उन्हातान्हांतून त्या फाळणी पार्टींत ! " मामांचे हें बोलणें ऐकून मला राग यायचा नाहीं, वाईटच वाटायचें !

डोळयापुढून कितीतरी चित्रें सरकायचीं माझ्या ! खरेंच, वडीलांनीं मामाचें ऐकलें असतें तर—तर आज मी—मी—

माझें हजामत केलेलें लहानसें डोकें गिरागिरूं लागायचें. वडीलांपेक्षां मला मामाबद्दल भलताच आदर वाटायचा ! गांवांतल्या इनामदाराच्या दगडी वाड्यावरून जातांना जेव्हां मामा मला अभिमानानें सांगायचें कीं " थोडक्यांत चुकलें ! नाहीं तर या इनामदाराच्या आईनें मलाच दत्तक घेतलें असतें, अन् आज मी या वाड्याचा मालक असतों ! " तेव्हां मामाच्या चेहऱ्याकडे

पहातांना मला इतिहासांतल्या एकाद्या थोर पुरुषाकडे पहात असल्याचा भास व्हायचा !

एकदां मी न् मामा बाजार पेठेंतून चाललो होतों. तों एका ठिकाणीं बरीचशी गर्दी जमलेली दिसली. गर्दी जमली कीं सगळ्याच्या आधीं मामा तेथें डोकावलेच म्हणून समजा. गर्दीतून वाट काढीत आम्ही आंत शिरलों. पहातों तों कोणी एक दाढीवाला मुसलमान लिलाव पुकारीत होता. त्याच्या भोंवताली बरेंचसें मोडकें तोडकें सामान पडलें होतें. आणि शेजारी एक पांढरें घोडें बांधलेलें होतें. लिलांव म्हटला कीं मामांना आधींच स्फुरण यायचें. मग खिशांत पैसा असो अगर नसो. त्यांतून तें घोडें पाहिल्याबरोबर तर मामांचें डोकेंच फिरून गेलें ! मामांना घोड्याचा फार नाद. आपल्या इतकी उत्तम घोड्याची पारख फक्त बडोद्याचा खंडेराव गायकवाडांना होती असें ते म्हणत. आम्ही गेलों त्यावेळीं घोड्याचा लिलाव चालला होता.

"आठ आणे—आठ आणे—एक वार—इंदूरच्या महाराजाचें पंचकल्याणी घोडें —आठ आणे ! " तो मुसलमान पुकारीत होता.

इंदूरच्या महाराजांचें पंचकल्याणी घोडें–अन् आठ आण्याला ! मामांचें डोकें फिरून गेलें ! माझा हात दाबून मामा घोगऱ्या स्वरांत म्हणाले, " बाबू, पळ, घरून आईकडून एक रुपया घेऊन ये ! हें घोडें आज मी जाऊन देणार नाहीं ! "

" पण मामा, आपल्याला घोडं काय करायचं ? "– मी भीत भीत पुटपुटलों !—

" बाब्या गाढवा, तूं देखील तुझ्या वडिलासारखं माझं ऐकणार नाहींस वाटतं ! " मामा चिडून म्हणाले, " हें राजाचं घोडं घरांत शिरलं, तर घरावर सोन्याचीं कौलें चढतील ! आहेस कुठें तूं ! " मी घराकडे धूम ठोकायच्या आधींच मामा त्या मुसलमानाकडे पाहून जोरानें गरजले, " साडे नऊ आणे ! "

आईनें मला रुपया देतांना विचारलें कीं कशाला पाहिजे म्हणून. मी धापा टाकीत म्हणालों, " घरावर सोन्याचीं कौलं चढवावयचींत ! "

मी रुपया घेऊन बाजारपेठेंत येईपर्यंत लिलाव संपून देखील गेला होता ! अवघ्या बारा आण्यांत मामांनीं त्या पंचकल्याणी घोड्याचा लिलांव घेतला होता ! भोंवतालीं जमलेल्या लोकांना त्या घोड्याच्या अंगांतिल गुण वर्णन करण्यांत मामा अगदीं रंगून गेले होते. बारा आणे हातांत पडतांच बाकीच्या सामानाचा लिलांव थांबवून तो मुसलमान घाईघाईनें तसाच चालता झाला.

उरलेल्या चार आण्यांपैकीं एक आण्याच्या विड्या स्वतःसाठीं आणि तीन आण्याचें हिरवें गवत घोड्यासाठीं मामांनीं खरेदी केलें. विडीचा एक झुरका मारीत मामांनीं थोडेंसें गवत त्या घोड्यापुढें केलें. पण त्या ' उमद्या प्राण्या ' नें त्या गवताकडे ढुंकून देखील पाहिलें नाहीं. एकाद्या स्थितप्रज्ञ साधूप्रमाणें तें उन्हांत तसेंच उभें होतें.

" राजाचें घोडें—असें गवत थोडेंच खाईल रस्त्यांत ! " मामा गर्हिवरून म्हणाले, " त्याला घरीं घेऊन गेल्यावाचून खाणेंपिणें नाहीं सुचणार ! " तबेल्यांत बसून खाण्यापिण्याची त्याची संवय !

घोड्याच्या गळ्यांतली दोरी धरून मामा पुढें झाले; हातांत गवताची पेंढी घेऊन मी मागें झालों.

" हं–चल बेटा ! " मोठ्या सहानुभूतीनें मामा पुटपुटले ! पण कसचें काय ? घोडें कांहीं जागचें हलेना ! मामा किंचित् हंसले. जणुं कांहीं घोडयाचें मन आपल्यालाच कळलें असें त्यांनीं दाखाविलें. त्यांनीं मोठ्या प्रेमानें घोडयाच्या पाठीवर थाप मारली; पण घोडयाची फुरफुर नाहीं कीं कांहीं नाहीं ! तें आपलें गंभीर चेहरा करून उभेंच !

घोडयाची मनधरणी करण्याची मामांनीं शिकस्त केली ! पण तें कांहीं बधलं नाहीं !

शेवटीं मामा अगदीं शिवीगाळीवर आले ! कोणतीही शिवी म्हणून त्या घोडयाला द्यायचीं त्यांनीं कांहीं बाकी ठेवली नाहीं ! पण कसचें काय अन् कसचें काय ! घोडें कांहीं आपली जागा सोडीना ! आतां मात्र मामांचा धीर सुटला ! त्यांतून रस्त्या-वरचे टारगट लोक जेव्हां फारच हसायला लागले, तेव्हां त्यांनीं शेजारच्या दुकानांतून एक सोटा मागून आणला.

" बाब्या, तूं धर ही घोडयाची दोरी, अन् ओढ त्याला पुढें ! " घोडयाला दिसेल अशा तऱ्हेनें सोटा परजीत मामा म्हणाले. होता नव्हता तेवढा जोर एकवटून मी दोरी पुढें खेचली ! " चक-चक-चक " मामा मागून सोट्यानें घोडयाला ढकलूं लागले ! पण छे, घोडें इंचभर देखील पुढें हलेना ! मामांच्या सहनशीलतेचा आतां मात्र कडेलोट झाला ! एक भयं-कर शिवी देऊन त्यांनीं असा कांहीं तडाखा मारला त्या सोट्याचा

त्याच्या पाठीवर ! घोडें एकदम चौखूर पुढें धांवेल म्हणून हातां-तील दोरी सोडून मी एकदम बाजूला झालों आणि मागें वळून पाहिलें तों काय !—

डोळे एकदम गरगर फिरवून घोडयानें आपलें अंग जमिनीवर धाडकन् टाकून दिलें तें कायमचेंच ! एका क्षणांत सारा कारभार आटपला ! मरतांना त्यानें समाधानानें हातपाय देखील झाडले नाहींत !

दुपारच्या उन्हांत घोडयाचें प्रेत मधोमध ठेवून मी अन् मामा किती वेळ तरी तसेंच रस्त्यांत बसलों होतो ! मला तर रडावें कां हंसावें हेंच कळेना ! " लक्ष्मी घरांत चालत आली होती—पण योग नव्हता ! " मामा उपरण्यानें नाक शिकरत दुःखानें म्हणाले.

घोडयाचें सारें और्ध्वदेहिक उरकण्यासाठीं मला आईकडून आणखी पांच रुपये मागून आणावे लागले. तेव्हां गांवच्या महारांनीं तो मुडदा तेथून उठविण्याचें कबूल केलें !

सारी निरवानिरव होईपर्यंत संध्याकाळ झाली. पण मामा कांहीं घरीं परत आले नाहींत ! "दुःखानें आपली कंबरच तर मोडली ! " असें म्हणून ते तसेच तेथून जे आपल्या गांवीं पसार झाले ते वर्ष सहा महिने पुन्हां आमच्या गांवाकडे म्हणून फिरकले नाहींत !

फिरतीवरून परत आल्यानंतर वडिलांना जेव्हां हें कळलें, तेव्हां दात ओंठ खाऊन ते म्हणाले, " त्याला येऊन तर दे पुन्हां इथें— "

# काळ आणि कादंबरी

५

" जगीं सर्व सुखी असा कोण आहे ? "

असा एक प्रश्न समर्थ रामदासांनीं मानवजातीला विचारून ठेवलेला आहे. तथापि हा प्रश्न जगांतील दरिद्री लोकांच्या वतीनें रामदासस्वामींनी विचारून ठेवलेला असावा, असें थोडासा विचार केला असतां दिसून येईल. वर्षानुवर्षे ज्यांच्या सुखाच्या वाढत्या भरतीला कधीं ओहोटीच लागली नाहीं, असे कितीतरी भाग्यशाली ' हरीचे लाल ' या जगांत असल्याचें मला माहीत आहे !

लीना ही अशापैकींच एक स्त्री होती. गर्भश्रीमंत आईबापांच्या पोटीं तिचा जन्म झालेला होता. मुंबईतील एका लक्षाधिशाच्या पुत्राशीं तिचें विसाव्या वर्षी लग्न झालेलें होतें. त्यानंतर दोनचार वर्षांच्या आंतच एका सुंदर बाळसेदार मुलाची आणि गुबगुबीत गालाच्या एका मुलीची, ती आई झालेली होती. त्यानंतर पुढें आणखी मुलें होण्याची आवश्यकता तिला न वाटल्यानें तिनें तशा तऱ्हेची योजनाही यशस्वी रीतीनें अमलांत आणलेली होती !

‘ वाळकेश्वरा ’ वरील समुद्राच्या अगदीं कांठावर असलेल्या एका विस्तीर्ण आणि प्रासादतुल्य बंगल्यांत परांच्या उंच आणि मऊ गाद्यांवर आणि शयन मंचकावर अक्षरशः लोळण्यापलीकडे तिला आयुष्यांत दुसरा कोणताही उद्योग उरलेला नव्हता ! किंबहुना लीनाचें उदाहरण समर्थ रामदासांच्या डोळ्यांना जर प्रत्यक्ष पहावयाला मिळाले असतें तर “ जगीं सर्व सुखी असा कोण आहे ? ” हा प्रश्न विचारण्याची त्यांची छातीच झाली नसती !

लीनाच्या अपरंपार सुखांत एवढासासुद्धां कोठें उणेपणा नव्हता नाहीं म्हणावयाला, सुख अति झालें म्हणजे तें दुखायला लागतें, या न्यायानें, सुखानें तुडुंब भरलेल्या तिच्या जीवनांत एकाच काळजीचा ठणका तिच्या मनाला लागून राहिलेला होता. तो हा कीं, “ आपल्या सुखी आयुष्यांतील क्षणन् क्षण घालवायचा कसा ? ” खरोखर सुख आणि दुःख यांच्यां स्वरूपांत जमीन अस्मानाचें अंतर असेल तरी दोहोंच्या चालींत आणि गतींत विलक्षण सारखेपणा आहे. यांत संशय नाहीं. दुःखी माणसाला आपल्या दुःखाचा एकेक क्षण साक्षात् एकाद्या युगासारखा वाटतो, तर सुखी माणसाला आपला सुखाचा क्षण कसा घालवावा हें कळत नसल्यामुळें तो एकाद्या कंटाळवाण्या युगाप्रमाणें मांडी घालूनच आपल्या छातीवर बसला आहे किंवा काय असें वाटत असतें. एकूण काय तर सुखी आणि दुःखी माणसाचें काळाशीं आपलें नेहमीं वाकडे !

अष्टौप्रहर मुलें दायांच्या आणि नोकरांच्या ताब्यांत असल्या-ल्यामुळें आणि व्यापारी कामाच्या निमित्तानें यजमान सकाळीं

नऊ वाजल्यापासून तों रात्रीं बारा वाजेपर्यंत घरांतून बेपत्ता असल्या कारणानें ( आणि दमून इतक्या उशिरा परत आल्या-नंतरही त्यांचा विशेष कांहीं उपसर्ग होण्याचा संभव नसल्यानें ) दिवसाच्या चोवीस तासापैकीं प्रत्येक क्षणान् क्षण कसा घालवावा हा लीनापुढें एक मोठा प्रश्नच येऊन उभा राहिलेला होता. काळाला ठार मारण्याशीं मानवी समाजानें ज्या अनेक युक्त्या शोधून काढल्या आहेत, त्यांपैकीं एकही युक्ति लीनाच्या उपयोगी पडण्यासारखी नव्हती. बाळबोध हिंदू घराण्यांतील बोलूनचालून ती एक स्त्री असल्यामुळें, आणि उच्च शिक्षणासाठीं विलायतेची वारी करून येण्याची संधी तिच्या आयुष्यांत पूर्वी उत्पन्न न झाल्यामुळें विडी सिगारेट ओढणें किंवा मद्यपान करणें या गोष्टी तिला शक्यच नव्हत्या. बिछान्यावर लोळण्यास सरावलेल्या तिच्या सुखलोलुप शरिराला घोड्याच्या शर्यतीच्या मैदानावरचा धांव-पळीचा जुगारही विशेष मानवण्यासारखा नव्हतां. सामाजिक कार्य करण्याच्या साळसूद नांवाखालीं स्वतःच्या श्रीमंती प्रतिष्ठेचें स्तोम माजविण्याइतका मतलबी अप्रामाणिकपणाही लीनाच्या स्वभावांत मुळापासूनच नव्हता. त्यामुळें वेळ घालविण्याची श्रीमंत समाजाची जी एक ठरलेली चाकोरी होती त्या चाकोरीच्या मार्गानें चालत जाणें लीनाला शक्यच नव्हतें.

लीनाच्या सुखी आयुष्यांतील या ' भयंकर संकटा ' पासून एक दिवस अचानकपणें एका माणसानें तिची सुटका केली! हा माणूस दुसरा तिसरा कोण नसून मोटार हांकणारा तिचा ड्रायव्हर गोकुळ हाच होय! एके दिवशीं संध्याकाळीं कुलाब्याला फिरायला

गेली असतांना घरीं परत येण्यासाठीं म्हणून लीना आपल्या मोटारींत येऊन बसली. मालकीण मागें मोटारींत बसली कीं ड्रायव्हरनें ताबडतोब गाडी सुरू करावयाची हा नेहमीचा शिरस्ता; पण त्या दिवशीं गोकुळला काय झालें होतें कोणास ठाऊक. मागें गाडींत येऊन लीना बसली त्याला तब्बल एक मिनीट पूर्ण झालें, तरी त्याला त्याची शुद्ध नव्हती ! आणखी एक मिनीट कसें तरी गेले असेल ! शेवटीं लीना चिडून ओरडली, " गोकुळ–" तेव्हां गोकुळ खडबडून जागा झाला आणि भ्रमिष्ट चेहऱ्यानें लीनाकडे पाहूं लागला.

" झोंपला होतास कीं काय ? " लीनानें आणखी रागाऊन विचारलें.

" नाहीं बाईसाहेब–" गोकुळ दांत विचकून ओशाळ्या स्वरांत म्हणाला.

" हें वाचतां वाचतां माझं मन इतकं गढून गेलं होतं, कीं आपण मागें गाडींत येऊन केव्हां बसलांत तें माझ्या ध्यानांत आलें नाहीं. "

असें म्हणून गोकुळनें आपल्या हातांतलें एक लहानसें चोपडें वजा पुस्तक दाखविलें न दाखविल्यासारखें केलें. लीनानें तें पुस्तक त्याच्या हातांतून खसकन् ओढून घेतलें आणि पाहिलें तो कुठल्याशा एका चार आणे मालेत प्रसिद्ध झालेली ' रंगेल डाकू ' या नांवाची ती एक कादंबरी होती. एका बेशुद्ध अवस्थेत असलेल्या सुंदर तरुणीला डोळयांला काळीं ढापणें लावलेला एक तगडा तरुण पळऊन नेत आहे असें एक भडक चित्र त्या कादंब-

रीच्या मुखपृष्ठावर चितारलेलें होतें. तें चित्र पाहतांच गोकुळची हजेरी घेण्यासाठीं अर्धवट उघडलेलें लीनाचें तोंड तसेंच निःशब्द स्थितींत कायम राहिलें. पुठ्याचें पान उलटून तिनें कादंबरीच्या पहिल्या पानांवर दृष्टी टांकली नाहीं तोंच—

त्यानंतर जवळ जवळ दोनतासपर्यंत ती शुद्धीवर आली नाहीं, असें म्हटलें तरी चालेल! शेवटच्या प्रकरणांतील शेवटच्या ओळीचा अगदीं शेवटला शब्द वाचून ती कादंबरी कोठल्या छापखान्यांत कोणी छापली, या मजकुरापर्यंत ती जेव्हां येऊन ठेपली, तेव्हां ती कुठें भानावर आली. पुस्तक मिटवून ती आजू-बाजूला पाहूं लागली. तों बाहेर अंधार पडला होता. अर्थात मोटारीमधला विजेचा दिवा गोकुळनें आधींच लावून ठेवलेला होता. हें ओघानेंच आलें. "काय आहे कीं नाहीं सुंदर हें पुस्तक मग आम्ही काय म्हणत होतों?" अशा अपेक्षेनें चमकणाऱ्या सस्मित चेहऱ्यानें गोकुळ तिच्याकडे पाहात होता! लीनानें आपल्या हातांतील हिऱ्याच्या घड्याळाकडे पाहिलें तो नऊ वाजून गेले होते.

"काय नऊ!" लीना स्वतःशींच एकदम उद्‌गारली, म्हणजे दोन तास मी हें वाचीत होतें कीं काय, कसा वेळ गेला हें मला कळलं सुद्धां नाहीं!"

गाडी सुरू करतां करतां गोकुळ विजयाच्या आनंदानें वाजवी-पेक्षां मोठ्यानें हंसला. मागें मालकीण बसली आहे, याचें त्याला जणुं कांहीं भानच राहिलें नाहीं.

वेळ कसा घालवावा याचें लीनाला जें एक भयंकर कोडें पडून

राहिलें होतें तें एकदमच सुटल्यासारखें तिला वाटलें. घरीं परत येतां येतां माधव बागेंतील कुठल्या तरी एका दुकानांतून गोकुळच्या मदतीनें एक आणा, दोन आणे, तीन आणे, चार आणे मालेंतील जेवढ्या कादंबऱ्या तिला विकत आणणें शक्य होतें तेवढया खरेदी करून ती घरीं आली.

त्यानंतर जवळ जवळ एक तब्बल महिना ती आपल्या अंथरुणावरच पडून होती ! अर्थात ती आजारी नव्हती हें सूज्ञ वाचकांनीं ताबडतोब ओळखलें असेलच. आपल्या छपरी पलंगाच्या विस्तीर्ण बिछान्यावर दोन्ही बाजूला कादंबऱ्यांचे भारेच्या भारे मांडून ती त्यांमध्यें बेहोषपणें पहुडलेली होती. खाण्याची, जेवण्याची किंवा झोंपण्याची तिला जवळ जवळ शुद्ध नव्हती असें म्हटलें तरी चालेल. तिचे सर्व उपचार एकाद्या आजारी माणसाप्रमाणं बिछान्यावर पडल्या पडल्या, पण कादंबऱ्या वाचतां वाचतांच चालत असत. अखेर काळाला ठार मारण्याचा 'कादंबरी' नामक एक बिनतोड तोडगा तिच्या हातीं सांपडलाच एकदांचा ! आतां तिच्या सुखामध्यें कोणत्याही तऱ्हेचा उणेपणा शिल्लक उरला नव्हता; या नंतर मोटारीमध्यें बसून सकाळीं व संध्याकाळीं बाहेर फिरावयास जाणें तिनें जवळ जवळ वर्ज्यच केलें होतें. ड्रायव्हर गोकुळला आतां एकच उद्योग लागून राहिला. दर शनिवारीं नव्या आणि जुन्या बाजारांत मिळतील तेवढया सर्व कादंबऱ्या खरेदी करून आणि त्या मोटरींत घालून तो सारा बोजा मालकिणीच्या पलंगाभोंवतीं आणून सुपूर्द करावयाचा एवढेंच आतां त्याचें काम राहिलें. पुष्कळ वेळां दुकानदाराच्या हात-

चलाखीमुळें किंवा गोकुळच्या उपजत मूर्खपणामुळें त्याच त्याच कादंबऱ्या तो खरेदी करून आणीत असे. अर्थात गोकुळच्या तें जसें ध्यानांत येत नसे तसे कादंबरी वाचनाच्या भुकेनें वखवखलेल्या लीनाच्याही तें कधींच लक्षांत आलें नाहीं.

अशा अखंड बेहोष अवस्थेंत लीनाच्या आयुष्याचीं एक नाहीं दोन नाहीं चांगलीं एकावर दोन बारा वर्षें गेलीं ! अर्थात् तिला स्वतःला या बारा वर्षांचा पत्ता नव्हता हें सांगावयास नकोच ! तिचा थोरला मुलगा बी. ए. ची परीक्षा पास होऊन पुढील अभ्यासक्रमासाठीं विलायतेस गेला आणि तिच्या धाकट्या मुलीचें लग्न होऊन ती मुंबई बाहेर आपल्या सासरीं नांदायला गेली, तरी लीनाला त्या गोष्टींचें भानही नव्हतें. कादंबरी वाचनाची तिनें डोक्यांत चढवून ठेवलेली समाधी कोणत्याही कारणानें खालीं उतरणें शक्य नव्हतें. एवढ्या काळांत मराठी भाषेंतील एकूण एक कादंबऱ्या तिनें वाचून काढल्या.'हरी नारायणां' च्या वाचल्या, 'नारायण हरी 'च्या वाचल्या, ' इंदु प्रकाशांतील ' दातारांच्या वाचल्या, ' मनोरंजनां ' तील गुर्जरांच्या वाचल्या, नाथमाधवांच्या वाचल्या, हडपांच्या वाचल्या,फडके खांडेकरांच्या वाचल्या, वरेरकरांच्या स्वतःच्या वाचल्या, त्यांनीं भाषांतर केलेल्या वाचल्या, त्याशिवाय आणा दोन आणेवाल्या मालापासून तो 'सरस सुरस' मालामधून चुरशीनें प्रसिद्ध झालेल्या एकूण एक कादंबऱ्या तिनें अव्वलपासून अखेरपर्यंत एकही शब्द न गाळतां वाचून काढल्या. निम्म्यापेक्षां अधिक कादंबऱ्या तर आपण एकादी नवीन कादंबरी वाचीत आहोंत अशा भावनेनें दोनदांच नव्हे तर दहा दहा बारा बारा

वेळां देखील तिनें वाचल्या. अशा रीतीनें कादंबरी वाचनांत तिनें घालविलेला बारा वर्षांचा अखंड काल म्हणजे काळाला ठार मारण्याचें तिनें जवळ जवळ एक अघोर तपच पूर्ण केलें असें म्हटलें तरी चालेल.

पृथ्वीतलावर कोणतीही एकादी अद्‌भुत गोष्ट घडली कीं तिचा ' रिपोर्ट ' स्वर्गापर्यंत हमखास हा जायचाच हें पुराण-कालापासून आपल्याला माहित आहे ! शुक्राचार्यासारखा अगर विश्वामित्रासारखा एकादा ब्रह्मचारी योगी पुरुष मांडी घालून अघोर तपश्चर्या करावयाला बसला कीं, तिकडे स्वर्गांत इंद्राचें आसन आपोआप डळमळायला हे लागायचेंच ! ब्रह्मचर्याचें आणि इंद्राचें अनादि कालापासून एवढे वाकडें कां याचा कोणालाही अजून पत्ता लागलेला नाहीं ! काळावर मात करण्यासाठीं कादंबरी वाचनाची अघोर तपश्चर्या लीनानें जेव्हां सुरू केली, तेव्हां त्या गोष्टीची खबर स्वर्गामध्यें भगवान् काळपुरुषाला त्याच्या दूतांनीं पोंहोचविली नाहीं असें कसें होईल ? पण उपेक्षेनं हसण्यापलीकडे ' काळानें ' त्या गोष्टीची दादच घेतली नाहीं ! जगाच्या आरंभापासून अगणित वस्तूंचा आणि प्राणांचा नाश करून करून त्या निशेंत उन्मत्त झालेल्या काळाला वाळकेश्वरावर मराठी कादंबऱ्या वाचीत बसलेल्या एका क्षुद्र स्त्रीची काय पर्वा असणार ? जगांत युद्धें, दुष्काळ, सांथीचे रोग, निर्माण करून असंख्य मानवी जीवांची हत्त्या करण्यांत रंगून गेलेल्या काळपुरुषाला आपल्याला ठार करण्याचा पृथ्वीतलावर कोणी प्रयत्न करीत आहे, हें सहजासहजीं कळण्यासारखें नव्हतें. ज्या दिवशीं कादंबरी वाचनाची

लीनाचीं बारा वर्षे पूर्ण झालीं, त्या दिवशीं स्वर्गात आपल्या रेड्यावर बसून काळपुरुष हिंडत असतांना एकदम वरचेवर हवेंत उडाला आणि खालीं जमिनीवर ( म्हणजे स्वर्गातल्या ) येऊन दणकन् आदळला ! लांबून एखाद्या वाघाचा वास यावा किनई, तसा त्याचा रेडाही लाल डोळे करून आणि नाकपुडया फेंदारून पृथ्वीतलावर वाळकेश्वराच्या दिशेनें रोखून बघूं लागला. त्याच क्षणीं मुंबई विभागावर नेमलेले कालदूत धापा टाकीत काळ-पुरुषापुढें येऊन हजर झाले आणि घाबऱ्या स्वरांत सांगूं लागले, " भगवन्, आपण प्रत्यक्ष जाऊन या गोष्टीचा बंदोबस्त कराल, तरच यापुढें आपली धडगत आहे ! आम्ही तर हरलोंत ! "

तेव्हां नाइलाज म्हणून बाकीचीं कामें काळपुरुषानें बाजूला ठेवलीं, आणि आपल्या रेड्यावर बसून स्वारी ताबडतोब मुंबईच्या रोखानें निघाली. लीनाचा बंगला शोधून काढण्यास त्याला कांहीं फारसा प्रयत्न पडला नाहीं. लीनाच्या घराचा नंबर काय एवढेंच त्यानें एका पोलिसाला विचारलें. फाटकाबाहेरच्या एका झाडाला आपला रेडा बांधून काळपुरुष पाय न वाजवितां हळूच बंगल्यांत शिरला. सर्व जगाला भयकंपित करणारा काळपुरुष ! पण लीना-च्या खोलींत पाय टाकतांना पायांपासून शेंडीपर्यंत त्याला अक्षरशः घाम सुटला होता म्हणाना ! कादंबऱ्यांच्या प्रचंड ढिगांत बेहोष होऊन पडलेल्या लीनाच्या चेहऱ्यावरचें तें उग्र तपस्तेज बघून काळपुरुषानें आपले डोळे क्षणभर मिटूनच घेतले ! पांच मिनिटें झालीं–पंधरा मिनिटें झालीं–जवळ जवळ एक तास झाला ! भिंती वरच्या घड्याळानें काळपुरुषाकडे डोळे मिचकावूनच बारा वाज-

त्याचे बारा कर्कश टोलेही दिले! तरीदेखील काळपुरुष आपल्या खोलींत येऊन आपल्या शेजारी उभा असल्याची लीनाला जाणीव नव्हती. नुकतीच प्रसिद्ध झालेली फडक्यांची 'अखेरचें बंड' कादंबरी वाचण्यांत ती गुंग होऊन गेली होती. शेवटीं कंटाळून जाऊन लीनाचें लक्ष आपल्याकडे वेधण्यासाठीं म्हणून काळपुरुषानें आपल्या बर्फासारख्या थंडगार बोटांचा स्पर्श तिच्या कपाळाला केला; पण शेजारीं घोरत पडलेल्या आपल्या यजमानांचा हातच चुकून आपल्या अंगाला लागला अशा कल्पनेनें लीनानें वाचतां वाचतां त्या दिशेला एक थप्पड लगावल्यासारखें केलें. काळपुरुषाच्या सहनशीलतेला आतां कांहीं सीमाच राहिली नाहीं. शेवटचा निश्चय करून त्यानें लीनाचा खांदा गदगदून हालविला; आणि कर्कश स्वरांत तो म्हणाला, " लीना—! " तथापि काळपुरुषाकडे ढुंकूनही वर न पाहतां लीनानें आपल्या हातांतील 'अखेरच्या बंडा' चा असा कांहीं जबरदस्त 'पांचशें पानी' तडाखा त्या काळपुरुषाच्या श्रीमुखांत लगावला कीं त्याच पावलीं तो तीन ताड मागल्यामागें खिडकींतून उडाला आणि लांब बाहेरच्या फाटकापाशीं येऊन आदळला.

जमिनीवर बसल्या बसल्या गाल चोळीत चोळीत काळपुरुष अंधारांत आजुबाजूला पाहूं लागला. तो त्याच्या रेडयाचाही कोठें पत्ता नव्हता. झाडाला बांधलेलें त्याचें तुटकें दावें तेवढें शिल्लक उरलेलें होतें! रेडयाची गंमत अशी झाली कीं, नेहमींप्रमाणें कादंबऱ्यांचा एक भला मोठा गठ्ठा मोटारींत भरून गोकूळ बंगल्याच्या फाटकांत शिरत असतां त्या कादंबऱ्यांच्या वासानें तो

रेडा इतका बिथरला कीं आपली दोरी तोडून तो थेट स्वर्गापर्यंत तसाच उधळत गेला! एकदांही त्यानें मागें वळून पाहिलें नाहीं. अर्थात् रेडाच नसल्यामुळें भगवान् काळपुरुषाला आपला स्वर्गापर्यंतचा प्रवास गाल चोळीत चोळीत पायींच करणें भाग पडलें, हें सांगणें नलगे!

दुसऱ्या दिवशीं स्वर्गात एक प्रचंड सभा बोलावून आधल्या दिवशींच्या अपमानानें संतापलेल्या भगवान् काळपुरुषानें 'कादंबरी' या मानवी लेखन प्रकाराला 'भयंकर' शाप देऊन टाकला:—

"मला ठार मारण्यासाठीं पृथ्वीतलावर मनुष्यप्राण्यानें जीं जीं शस्त्रें शोधून काढलीं आहेत त्या सर्वांमध्यें 'कादंबरी' हें एक अमोघ शस्त्र आहे हें मला मान्य आहे. 'कादंबरी' हा शब्द उच्चारतांना माझ्या सर्वांगाला कांपरें सुटत आहे आणि 'अखेरच्या बंडा' मुळें माझा डावा गाल जो कालपासून लाल झाला आहे. तो अद्यापीहि तसाच आहे. कादंबरी लिहिणारांचा हात धरणें शक्यच नाहीं असें विचाराअंतीं मला आढळून आल्याकारणानें कादंबरी लिहिणाराला आणि वाचणाराला केवळ शाप देण्यापलीकडे; मला दुसरें कांहींही करतां येण्याजोगें नाहीं. तेव्हां संतापून मी; असा शाप देतों कीं, पृथ्वीतलावर जो माणूस 'कादंबरी' लिहील त्याला केवळ कादंबरीलेखनावर आपली उपजीविका करणें शक्य होणार नाहीं. त्याचा सारा जन्म दारिद्र्यांत आणि हालअपेष्टेंतच जाईल. त्याप्रमाणें मला ठार मारण्यासाठीं म्हणून जो कोणी अशा कादंबऱ्यांचें

एकसारखें सतत वाचन करीत राहील त्याच्या स्मरणांत वाचलेल्या मजकुरापैकीं एक अक्षरही शिल्लक रहाणार नाहीं ! ”

वाचकहो, कादंबरी लेखकाला आणि वाचकाला काळपुरुषानें देऊन ठेवलेला हा कायमचा शाप खरा आहे का खोटा आहे, याचा आतां निवाडा करणें मी तुमच्याच हातीं सोपवितों. अर्थात् ही मी जी तुम्हांला सांगितलेली आहे ती ‘ कादंबरी ’ नसून एक लघुकथा आहे. तेव्हां काळपुरुषाचा शाप हिला लागू नाहीं आणि म्हणून तिच्यांतला अर्थ तुम्ही विसरून जाणें शक्यच नाहीं याविषयीं माझी खात्री आहे.



# आम्ही सात जण आणि ती ! ६

आम्हीं एकंदर सात जण होतों. सदू, दिन्या, विशा, सोन्या, बाळू, चिंतू आणि मी. साधारण एकाच वयाचे अन् एकाच गांवचे. आमचीं वयें असतील बारापासून चौदापर्यंत. इंग्रजी शिकण्यासाठीं आम्हीं पुण्यास येऊन राहिलों होतों. दोघेतिघे चौथींत होतों. कांहीं पांचवींत होतों. विशा सगळ्यांपेक्षां वयानें मोठा. आणि मठ्ठही पण तो तेवढा तिसरींत होता.

कसबा पेठेंत एका बोळांत वाडा होता कुठल्याशा इनामदारांचा. खूप जुना आणि खूपच मोठा. आंत कितीतरी खोल्या अन् किती तरी चौक. पुष्कळ बिऱ्हाडें भरलीं होतीं आंत. आम्हींही सारे तिथेंच होतों. पण अभ्यासाला मात्र आम्हीं एका ठिकाणीं बसायचें एका माडीवर. चांगली लांबलचक माडी होती ती सात खणी. सात खिडक्या होत्या तिला रस्त्याच्या बाजूकडे. खिडक्यांना कातीव मदिरापी होत्या. आणि वर पटई होती शिसवीची !

जेवण्यापुरतें आम्हीं आपापल्या बिऱ्हाडांत जात असूं तेवढेंच काय तें ! बाकी सारा वेळ आम्हीं आपले त्या माडींत असायचें. खेळत, हुदडत नाहीं तर किंचाळत. असा कोणताही खेळ नव्हता कीं, जो आम्हीं त्या माडीवर खेळत नसूं ! बदाबदी, हुतूतूपासून तों क्रिकेटपर्यंत ! अशा धांगडधिंग्यानें जमिनीचा अगदीं उकिरडा होऊन जाई. मग दर रविवारीं शेण आणून आम्हीं सारी जमीन सारवून घ्यायचे.

एक अभ्यासाची गोष्ट सोडली तर बाकीच्या कोणत्याही बाबतींत आम्हीं सातीजण हार जाण्यापैकीं नव्हतों. खालीं चौकांत हौद होता पाण्याचा. त्याच्या शेजारीं सोनचाफ्याचें झाड होतें उंच. रोज सकाळीं उठून हौदावर आंघोळी करायच्या थंड पाण्यानें. म्हणजे पाण्याच्या बादल्या ओतून घ्यायच्या डोक्यावर भडाभड. मग धोतरें धुवायचीं आपापलीं. अगदीं त्यांच्यावर गुलाबी झांक येई तोंपर्यंत. चांफ्याच्या झाडावर चढून फुलें तोडायची. नंतर घाईघाईंत जेऊन शाळेंत जायचें सर्वांनीं अगदीं बरोबर. शाळा चुकवायची झाली तरी ती देखील सर्वांनीं बरोबरच. कधीं रात्रीं भटकायला जायचें झालें तरी सर्वांनीं मिळून; म्हणजे माडीच्या खिडक्यांतून रस्त्यावर उड्या मारून.

पण चुकून एकाच्याही तोंडून कधीं अवाक्षर निघायचें नाहीं त्याबद्दल. सात जण आम्हीं, पण एका दिलाचे नि एका जीवाचें. एकाला कुठें टोंचलें तर सारे विव्हळायचे; एकाला कांहीं मिळालें तर सारे नाचायचे !

तऱ्हा पाहिली तर प्रत्येकाची निरनिराळी. स्वभावही प्रत्ये-

काचा निराळा निराळा. सदूला खाण्याचा नाद तर दिन्याला मारामारी करायचा. विशा सकाळपासून संध्याकाळपर्यंत तालीम करायचा. सोन्याला वयाच्या मानानें लौकरच मिशा फुटायला लागल्या होत्या. तो मिशांना पीळ भरीत बसायचा. बाळूला गाण्याचें वेड तर चिंतूला नाटकांत काम करण्याचें आणि मला वाचण्याचें. माझ्या डोक्यांत नुसत्या कविता न् कादंबऱ्या भरल्या होत्या. सात जणांचे सात प्रकार होते, पण मनानें मात्र सारे एक. सगळ्यांचे ठरल्यावांचून कोणी कांहीं करायचा नाहीं.

सुट्टीचा दिवस होता एक. सकाळचे दहा वाजले होते. खिडकीकडे तोंड करून विशा जोर काढीत होता. काय झालें कुणास ठाऊक. जोर काढतां काढतां विंचू डसावा तसा विशा उठला आणि ताडकन् उडी मारून खिडकीकडे धांवला. विशा धांवला तसा सोन्या धांवला. सोन्या धांवला तसा दिन्या धांवला. सारेच खडबडून उठलों आम्ही. आणि साती खिडक्यांतून डोकावून बाहेर बघूं लागलों. एक खिडकींतून बघूं लागला कीं सारे बाहेर बघणारच. हें मुळीं आमचें अगदीं ठरलेलेंच.

समोर मारवाड्याचें एक घर होतें. होतें अरुंद दोन खणीं, पण तीन मजली. चकचकीत रोगणाचा भडक तांबडा रंग दिला होता त्याला. त्यामुळें त्या जुनाट मळक्या बोळांत तें घर एकदम डोळ्यांत शिरल्यासारखें दिसायचें. काळ्या माणसाच्या अंगावर उठलेल्या लाल कोडाप्रमाणें. बांधल्यापासून तें घर बंदच होतें. त्याच्या तिसऱ्या मजल्याच्या छपराला एक काळी बाहुली मात्र कित्येक दिवस लोंबत होती. कोणी म्हणत घर बांधून मालक मुलखाला

गेला तिथेंच मेला. कुणास ठाऊक. पण आज इतक्या दिवसांनीं त्या घरांत कुणी तरी रहायला आलें होतें. दुसऱ्या मजल्याच्या तीन खिडक्या उघडल्या होत्या, आणि सज्जांत एक बाई उभी होती. डोळे फाडून फाडून विशा तिच्याकडेच बघत होता. आम्ही आळीपाळीनें तिच्याकडे आणि विशाकडे बघत होतों.

विशा तिच्याकडे कां बघत होता हें आम्हांला कळेना. आम्हां सर्वांपेक्षां वर्षादोन वर्षांनीं तो वडील होता. आणि अभ्यासांत जरी तो सर्वांच्या मागें होता, तरी पण त्याची वयाची वडीलकी आम्ही मानीत असूं. कां कोण जाणें, आमच्यापेक्षां जगांतलें त्याला पुष्कळच कांहीं तरी कळतें असें आम्हांला नेहमीं वाटायचें. बायकांबद्दल अलिकडे तो बराच बोलूं लागला होता. आणि त्याचें तें बोलणें आम्हांला देखील पुष्कळच आवडायचें. पण एकाद्या नवख्या बाईच्या चेहऱ्याकडे इतक्या समोरासमोर आणि इतक्या जवळून बघण्याची ही आमची पहिलीच वेळ होती.

पहिल्यानें पाहिलें तेव्हां ती दिसली एखाद्या बाईसारखी. डोक्यावरून पदर होता तिच्या. पण पुन्हां पाहिलें तेव्हां ती. मुलीसारखी दिसली. क्षणभर ती मुलगी आहे कां बाई आहे हेंच कळेना. पण ती अगदीं तरुण होती आणि आमच्यापेक्षां मोठी होती एवढें खास. टिकल्या टिकल्याचें पातळ नेसली होती ती. आणि तिच्या साऱ्या अंगावर सोन्याचे न् मोत्याचे दागिने झळकत होते. लग्नसमारंभांत श्रीमंतांच्या कितीतरी बाया पाहिल्या होत्या आम्ही,पण अशी बाई मात्र आम्ही कधींच पाहिली नव्हती.

कांहींतरी निराळीच दिसत होती ती. आम्हीं तिच्याकडे बघतो न बघतो, तोंच डोळे वर करून तिनें आमच्याकडे पाहिलें. आणि ती अशी सुरेख हंसली म्हणतां–

लाजून मागच्या मागें आम्ही कोलमडलोंच. सदूनें दिन्याच्या पाठीवर जोरानें थाप मारली. सोन्या एवढा गंभीर पण कोपऱ्यांत जाऊन त्यानें शीर्षासन उभारलें. ' मला मदन भासे ' म्हणून बाळूनें तान ठोकली अन् चिंतू कोठल्या तरी नाटकांतलें भाषण किंचाळूं लागला. आणि विशानें मला अशी कडकडून मिठी मारली कीं, माझा अर्धा प्राण डोळयांतून बाहेर येतो कीं काय असें मला वाटलें.

" माझ्याकडे बघून ती हंसली ! " सोन्या हवेंत तंगड्या झाडीत म्हणाला.

" नाहीं–माझ्याकडे बघून ! " बाळू ओरडला.

" मूर्ख आहात, ती आमच्याकडे बघून हंसली ! " दिन्या सदूच्या हातावर टाळी मारीत म्हणाला. सोन्या न् बाळू चिडून त्यांच्या अंगावर धांवले. मारामारी जुंपते कीं काय असें वाटलें. पण विशानें गंभीर चेहरा करून सांगितलें, " ती आपणा सर्वां-कडे बघून हंसली ! " त्याबरोबर आनंदानें बेहोष होऊन आम्हीं विशाला अशा कांहीं मिठ्या मारल्या—छे, त्या रात्रीं आमच्या-पैकीं कोणालाच झोंप आली नाहीं !

दुसऱ्या दिवसापासून आमचा आयुष्यक्रम एकदम बदलला. आमचीं नेहमींची मारामारी, आरडाओरड आणि दांडगाई एक-दम थांबली. सातीजणांच्या ट्रंका अन् वळकट्या सात खिड-

क्यांच्या जवळ येऊन पडल्या. परीक्षा जवळ आलेल्या होत्या. त्याचें निमित्त करून आम्ही शाळेंत जाण्याचें जवळ जवळ तह-कूबच केलें. जेवणाच्या वेळीं आम्हांला खालीं जावें लागे तेवढेंच. बाकीचा सारा वेळ आम्ही खिडक्यांतच मुक्काम करून होतों. विशानें तर तीन दिवस लंघन केलें. एखाद्या पुतळ्याप्रमाणें तो आपल्या खिडकींत उभा होता.

पण दिवसांतून फारच थोडा वेळ ती बाई आमच्या दृष्टीस पडे. तीन खिडक्यांपैकीं दोन खिडक्यांना तिनें चिकाचे पडदे लावले होते. एका खिडकींत तिनें पोपटाचा पिंजरा टांगला होता. पोपटाला खायला घालायला ती एकादे वेळीं सकाळीं खिडकींत यायची तेवढीच. त्यावेळीं आम्ही सारेजण पटापट आपापल्या खिडक्यांत खडे रहायचे. ती आमच्याकडे कधीं पहायची, कधीं नाहीं पहायची! पाहिलेंच तिनें आमच्याकडे तर आम्ही विशाच्या चेहऱ्याकडे पहायचें! तो तिच्याकडे बघून हंसला तर आम्ही हंसायचे अन् तिच्याकडे बघायचे.

दुपारभर तिच्या माडीच्या खिडक्या लागलेल्या असायच्या. संध्याकाळीं मात्र उत्तम उत्तम पोषाख करून ती आपल्या खिड-कींत बसायची. रोज तिचा पोषाख नवा नवा असे. आणि माडींत लावलेल्या झगझगीत दिव्याच्या प्रकाशांत तर तिच्या अंगावरचे कपडे अन् दागिने खूपच चमकायचे.

संध्याकाळचें हिंडायला जाणें आतां एकदम आम्ही 'कटाप' करून टाकलें. ती खिडकींत नटून थटून बसली कीं आम्हीही समोर आपापल्या खिडक्यांत उभे राहायचे. विशा आपले पिळ-

दार दंड फुगवायला लागावयाचा तर सोन्या आपल्या कोंवळ्या मिशा पिरगाळून त्यांना चांगलींच टोंकें आणावयाचा ! मी कोठली तरी कविता गुणगुणायला सुरुवात करायचा, तर बाळू ‘ पुरिया ’ रागांतली एकादी चीज आळवायला लागायचा ! सदू आणि दिन्या दिवसभर साबण लावून लावून स्वच्छ धुतलेले सदरे घालून ऐटींत उभे राहिलेले असायचे.

पण संध्याकाळचे वेळीं आम्हीं कितीही तिच्याकडे रोखून पाहिलें तरी ती आमच्याकडे बघायची नाहीं. कां कोणास ठाऊक. ती कोणाची तरी वाट पहात असावी, असें विशा म्हणायचा. पण आमचा त्यावर विश्वास बसला नाहीं. तिच्याकडे कोणीही येत नसे आणि तीही पण कुठें जात नसे. तिच्या घरांत माणसेंही कुणी नव्हती. फक्त एक म्हातारी मोलकरीण काय ती. रात्रींच्या वेळीं ती एकटीच सतार छेडीत बसायची. तिच्या सतारीचे बोल कानावर पडले कीं, अंगावरचीं पांघरूणें फेकून देऊन आम्हीं अंथरुणावर अर्धवट उठून बसायचे. आणि तासचे तास एकमेकांशीं न बोलतांना ते ऐकत रहायचे.

तिच्यावांचून आम्हांला आतां दुसरा विषयच उरला नाहीं. बोलणें, चालणें, विचार सारें कांहीं तिच्याबद्दल. ती कोण आहे, कोठून आली, काय करते, नांव काय तिचें याची कांहीं एक माहिती नव्हती आम्हांला. पण कां कोण जाणे. आम्हांला तिच्याविषयीं एकदम विलक्षण आदर वाटूं लागला. –आणि– दोन चार दिवसांनीं आपलेपणाही वाटूं लागला.

" कुठल्या तरी संस्थानची राजकन्या असावी ही ! " विशा निश्चयाच्या स्वरानें म्हणाला.

" मला वाटतें सध्यां ती अज्ञात अवस्थेंत असावी ! " कोणत्या तरी कादंबरीची आठवण होऊन मी म्हणालों.

" फार दुःखित दिसते बिचारी ! कसल्या तरी संकटांत असावी ! " दिन्या हळहळला.

" आपण येथें समोर असल्यावर संकटाची तिला काय भीति ! एकेकाला पालथा घालीन कोणी तिला त्रास द्यायला आला तर ! " सदू मुठी उगारून सात्विक संतापानें उद्गारला.

" दिवसभर तिचा वेळ कसा जात असेल कोणास ठाऊक ! कोणी तिच्याकडे येत नाहीं कीं जात नाहीं ! " चिंतू चुटपुटला.

" आपण येतां का तिच्या घरीं ! " सर्वांच्या मनांत एकदम एकावेळीं विचार आला. आणि अर्धवट शब्दही निसटले तोंडांतून तसे. पण मनांतला विचार तसाच एकदम थबकला. सारे चपापून एकमेकाच्या चेहऱ्याकडे बघूं लागलों ! तिच्यासाठीं सोनचांफ्याचीं ताजीं ताजीं फुलें किंवा तिच्या पोपटासाठीं एकादा पेरू किंवा डाळिंब घेऊन तिच्या माडीवर जायचें अन् तिची ओळख करून घ्यायची असा विचार रात्रभर माझ्या डोक्यांत थैमान घालत होता ! पण सकाळीं उठल्यावर तो इतरांना सांगायची कांहीं मला छाती झाली नाहीं.

आठ दिवस आमची माडी एकाएकीं इतकी शांत झाली कीं, आमच्या दंग्यानें आणि आरडाओरडीनें कंटाळलेल्या वाड्यांतील वडीलधाऱ्या बिऱ्हाडकरूंना आमच्याबद्दल अतिशय कौतुक वाटूं

लागलें. वार्षिक परीक्षा जवळ आल्यामुळें पोरें अभ्यासांत गढून गेलीं असावींत असाच सर्वांनीं समज करून घेतला.

नवव्या दिवशीं मुंबईहून एक पाहुणा आला आमच्या बिऱ्हाडीं. आमच्या चुलत्याचा मित्र होता तो. होता वीसपंचवीस वर्षांचा. राजे नांव त्यांचें. मुंबईचाच रहाणारा तो अन् त्यांतून घरचा बऱ्यापैकीं. झोंकांत कपडे होते त्याचे. आल्यानंतर दिवसभर कामांतच होता तो. पण संध्याकाळीं जो परत आला तो थेट आमच्याच माडीवर. खालीं बिऱ्हाडांत गर्दी होती म्हणून इथेंच झोंपूं रात्रभर असे कांहींसें तो म्हणाला. आम्हीं सारे मनांतल्या मनांत चरफडलों. ही नसती ब्याद कुठून उपटली ? पण बोलणार कसें ! सात खिडक्याशेजारीं मांडलेल्या आमच्या सात वळकट्यांचें कौतुक करीत राजे एका खिडकींत जाऊन बाहेर बघूं लागला. त्याबरोबर आम्हां सातही जणांच्या काळजांत एकदम कळ निघाली. समोरच्या बाईला—काय वाटेल तें झालें तरी—यानें बघतां कामा नये असाच सर्वांच्या मनांत विचार आला. कां कोणास ठाऊक ? पण नशिब कसलं द्वाड ! राजे खिडकींत यायला आणि ती समोरची बाई आपल्या खिडकींत रोजच्या प्रमाणें नटून यायला एकच गांठ पडली ! विजेचा धक्का बसावा तसा राजे एकदम ताठ होऊन तिच्याकडे बघूं लागला अन् तीही तशाच रोखल्या नजरेनें त्याच्याकडे बघूं लागली. आतांपर्यंत तिनें असें आमच्याकडे कधींच पाहिलें नव्हतें ! श्वास आवरून धरून आम्हीं थरथरत त्यांच्याकडे बघूं लागलों—

“ अरेच्या, ही इथें ! ” चमत्कारिक स्वरांत राजे एकदम

किंचाळला आणि आमच्याकडे वळून मोठ्यानें हंसला. आम्हीं आश्चर्यानें अगदीं कोलमडण्याच्या बेतांत आलों. ' ही '— आणि ' इथं ! '

" हें पहा, तुमचा कांहीं तरी गैरसमज होतों आहे राजे ! " विशा गंभीर चेहरा करून पुढें सरकला.

" म्हणजे-काय म्हणतां काय तुम्हीं ! " राजे आश्चर्यानें म्हणाला. त्याचें लक्ष अद्यापि समोरच्या माडीकडेच होतें.

" तुम्हांला वाटतं त्या बाई या नव्हत !" मी भीत भीत बोलण्याचें धाडस केलें, " या कुठल्या तरी संस्थानच्या—"

" संस्थानच्या ! " राजे खो खो हंसत म्हणाला, " काय मूर्ख आहांत तुम्ही पुण्याचीं पोरें ! अरे, ही ती साली—"

" हां ! खबरदार त्यांच्याबद्दल असें कांहीं बोलाल तर ! " दिनू आणि सदू मुठी वळून एकदम राजांच्या अंगावर चाल करून गेले. एका क्षणांत खोलींत भलतेंच गंभीर वातावरण निर्माण झालें. राजे चटकन् मागे सरला म्हणूनच वांचला.

" असें म्हणतां तुम्ही ! बरें आहे तर मग ! समोरच्या माडींत जाऊनच मी तुम्हांला नमस्कार करतों म्हणजे झालें. " राजे डोळे मिचकावीत म्हणाला.

" भ्रम आहे तुमचा भ्रम ! ती धक्के मारून तुम्हांला खालीं हांकून देईल तेव्हा कळेल ! " दिन्या चिडून म्हणाला. पण त्याचे शब्द ऐकायला राजे होता कोठें तेथें ! तो तडक बाहेर पडला !

राजाला खाऊं का गिळूं असें आम्हांला होऊन गेलें ! चिंतातुर चेहऱ्यांनीं आम्ही आपापल्या खिडक्यांत धांवलों अन् पुढें

काय होतें तें पहायला उभें राहिलों! ती बाई त्याची चांगलीच खोडकी जिरवील याबद्दल आम्हांला बिलकूल संशय नव्हता! "तशी ती बाई कांहीं सामान्य नाहीं!" विशा अधिकारवाणीनें म्हणाला.

रस्त्यावरच्या माडीनें राजे सरळ वर चढला, तो धाड् धाड् पाय वाजवीत थेट अगदीं तिच्या माडीवर गेला!

"काय उलट्या काळजाचा माणूस आहे हा!" दिन्या ओरडला. "तूं थांब! आतां लाथ खाऊन तो बाहेर धडपडेल तेव्हां दिसेल!" बाळू श्वास रोधून समोर बघत म्हणाला.

एक क्षण देखील गेला नसेल! आम्ही एकदम सारे चमकलों. अन् समोर बघतोय तों राजे आणि ती बाई अगदीं एकमेकांच्या गळ्यांत हात घालून—छे, छे, आमच्या डोळ्यावर आमचा विश्वास बसेना! आलीं-खुशाल दोघे सज्जांत आलीं! धडधडीत आमच्या समोर, आणि हंसायला लागली निर्लज्जासारखी आमच्याकडे बघून! बघवेना आम्हांला तें—डोळे मिटून घेतले आम्ही—

सातही खिडक्या एकदम फटाफट बंद झाल्या! आणि सात निश्चेष्ट शरीरें आपआपल्या वळकटयावर निर्जीवपणें कोलमडलीं! रात्रभर एकमेकांना मिठ्या मारून सारेजण रडत होतों आम्हीं. घरांतलें कोणी माणूस मरावें तसें. विशा तर गुरासारखा ओरडूं लागला. त्याची समजूत करतां करतां आम्हांला आमचें दुःख आवरून धरावें लागलें!

कित्येक दिवसपर्यंत आम्हीं त्या सात खिडक्या उघडल्या नाहींत.

त्या दिवसापासून स्त्रीजातीविषयीं आमचें अतिशय वाईट मत झालें !



# महापुरांत बुडालेला विष्णु ७

समुद्रांत बुडालेल्या ‘ रामदास ’ बोटीमधल्या त्या दुर्दैवी उतारूंवरून सहज आठवण झाली. वाचकहो, पाण्यांत बुडालेला माणूस तुम्ही पाहिला आहे काय ? मी पाहिलेला आहे. अगदीं माझ्या डोळ्यांनीं पाहिलेला आहे. मी एकट्यानेंच नव्हे तर, आमच्या साऱ्या गांवानें पाहिलेला आहे. फारच विलक्षण प्रसंग होता तो. त्या गोष्टीला आज जवळ जवळ छत्तीस सदतीस वर्षें होऊन गेलीं आहेत. मी त्यावेळीं अकरा वर्षांचा होतों बघा. सांगतोंच तुम्हांला कसें झालें तें. आमच्या सासवडला कऱ्हा नदी आहे. त्या नदीला चांबळी नांवाची एक लहानशी नदी मिळते. नदी कसली ? ओढाच तो. कऱ्हेचा नि चांबळीचा संगम गांवाच्या दक्षिणेला झालेला आहे. आणि त्या संगमावर संगमेश्वर नांवाचें एक भव्य, दगडी आणि उत्तुंग असें देवालय बांधलेलें आहे. सासवडला सोपानदेवाची समाधी आहे. ह्या समाधीच्या दक्षिणेकडच्या बाजूनें अगदीं जवळून चांबळीचा ओढा खालीं संगमेश्वराकडे

वाहत जातो. सोपानदेवाच्या देवळापासून तों संगमेश्वराच्या देवालयापर्यंत चांबळीचें पात्र अत्यंत खडकाळ आहे. खडकाचे मोठेमोठे सुळके या पात्रांमध्यें उभे आहेत. सोपानदेवाच्या अगदीं उजव्या बाजूला जो खडक आहे त्याला 'हत्ती खडक' म्हणतात. हा हत्ती खडक अगदीं हत्तीच्या गंडस्थळाप्रमाणें काळा कभिन्न आणि अजस्र आहे, तो पात्राच्या अगदीं मधोमध उभा आहे. त्यांची उंची वीस फूट तरी असेल. ह्या ठिकाणीं ओढयाची रुंदी जवळ जवळ शंभर फूट आहे. ह्या ओढ्यांत पावसाळ्याखेरीज क्वचितच पाणी असतें. वर्षभर बहुतेक तो कोरडा ठणठणितच असतो. हत्ती खडकाच्या दोन्ही बाजूंना करंगळीएवढया पाण्याच्या धारा आपल्या नेहमीं वहात असतात. तेथून खालीं थोड्या अंतरावर ह्या चांबळीच्या पाण्याचा एक लहानसा डोह बनलेला आहे. ह्याला रांजणडोह म्हणतात. आजूबाजूच्या काळयाभोर खडकामुळें ह्या डोहाचा आकार खापराच्या रांजणासारखा झालेला आहे, म्हणूनच कदाचित् त्याचें नांव रांजणडोह पडलेलें असावें. ह्या रांजणडोहाबद्दल गांवामध्यें निरनिराळया अफवा पसरलेल्या असत, कीं त्या डोहाच्या पाण्याचा म्हणे कधीं अंत लागत नाहीं. आणि त्या डोहाच्या तळाशीं सात 'आसरा' ( अप्सरा ) रहातात आणि डोहांत कोणी पोहायला गेलें कीं त्या 'आसरा' त्या माणसाला खालीं ओढून नेतात आणि मग तेथें त्याच्याबरोबर संसार करतात. आतां मला ह्या साऱ्या गोष्टीचें हंसूं येतें. पण आमच्या लहानपणीं आम्ही हें अगदीं खरें मानीत असूं. ह्या चांबळी नदीला वर्षातून एकादे वेळीं तरी पूर येत असे. आणि पूर आला तर तो

दोन चार तासांपेक्षां जास्त टिकत नसे. मात्र केवढाही मोठा पूर आला तरी हत्ती खडक कांहीं बुडायचा नाहीं, असे गांवकरी छातीवर हात मारून सांगत असत. हत्ती खडकाबद्दल गांवकऱ्यांना फारच अभिमान वाटत असे. आणि या अभिमानाला गालबोट लावण्यासारखें लाजिरवाणें वर्तन हत्ती खडकाच्या हातून तोंपर्यंत तरी कधींच झालेलें नव्हतें.

असाच पावसाळ्यामधला एक दिवस होता. सकाळपासून आभाळ थोडेसें भरून आलें होतें. पण थोडीशी भुरभूर पडून आकाश साफ निवळून गेलें होतें. आणि दुपारीं दोन वाजावयाच्या सुमारास तर लख्ख ऊनच पडलें होतें. त्या दिवशीं रविवार होता असें वाटतें. आम्ही दोनचार मुलें संगमेश्वराच्या देवळासमोर अलिकडच्या कांठावर विटीदांडू खेळत होतों. त्या ठिकाणाहून आम्हाला रांजणडोह आणि हत्ती खडक नीटपणें दिसूं शकत होते. तीन साडेतीनच्या सुमारास ' पाणी आलें, पाणी आलें ' अशी रांजणडोहाकडून आरोळी उठली. आम्ही खेळ थांबवून तिकडे वळून बघूं लागलों तोंच पाण्याचा लालभडक लोंढा चांबळीच्या पात्रामधून वेगानें रांजणडोहामध्यें उडी मारीत घुस-लेला आम्ही पाहिला. लोंढा कांहीं फारसा मोठा नव्हता, आणि आमच्यासमोर येऊन पोचेंपर्यंत तर तो अगदींच लहान होऊन गेला आणि चांबळीच्या पात्रांत घोट्याइतकें लाल लाल पाणी पसरलें. कऱ्हा नदीला सकाळपासून थोडासा पूर आलेला होताच. कारण वर पश्चिम भागांत सकाळीं बराच पाऊस झालेला असावा असें गांवांत लोक त्या दिवशीं म्हणत होते. म्हणून चांबळीला

पाणी आल्याबद्दल आम्हाला फारसें आश्चर्य वाटलें नाहीं. चांबळीच्या त्या पुरांत पहाण्यासारखें असें कांहींच नव्हतें. म्हणून पुराकडे बघण्याचें थांबवून क्षणभरानें आम्ही आमचा खेळ पुन्हां सुरू केला. अर्धापाऊण तासपर्यंत चांबळीकडे आम्ही ढुंकूनहि पाहिलें नाहीं. पण तेवढ्या वेळांत पुराचें पाणी झपाट्यानें वाढत गेलें. कांहीं वेळानें आम्ही बघतों आहोंत तों कऱ्हेपेक्षां चांबळीचाच पूर जास्त चढला होता. तें पाहून आम्ही चकितच झालों. ह्या भिकारड्या चांबळीला आज कुठून एवढा जोर आला असें म्हणून आम्ही एकमेकांकडे हंसून बघूं लागलों. इतक्यांत वर हत्ती खडकावर एक माणूस उभा असलेला आम्हाला दिसला. पुराचें पाणी त्या खडकाच्या दोन्ही बाजूंनीं वाहूं लागलें होतें. पण पुराच्या वर हत्ती खडक चांगला दहा पंधरा फूट वर होता. आणि त्याच्या ऐसपैस आणि रुंद टोकावर तो माणूस शांतपणें उभा होता. आम्हाला त्या माणसाची काळजी अशी मुळींच वाटली नाहीं. पण तिकडे जाऊन आपण बघावें तर खरें हा कोण माणूस उभा आहे तें, ह्या विचारानें आम्ही खेळ बंद करून सोपान देवाच्या देवळाकडे धांवत गेलों. दहा मिनिटांच्या आंतच ह्या खडकासमोरील कांठावर जाऊन आम्ही पोहोंचलों. पहातों तों खडकावर उभा असलेला माणूस दुसरा तिसरा कुणी नसून आमच्या चांगल्या ओळखीचा, विष्णु ब्रह्मे नांवाचा पंचवीस सव्वीस वर्षांचा आमच्या आळींतला एक तगडा तरुण होता. विष्णु चांगला तालीमबाज होता तो अविवाहित असून गांवांत भिक्षुकी करीत असे. स्वभावानें तो

अतिशय सालस असून गांवांतल्या प्रत्येक महत्वाच्या कार्यात अंग मोडून काम करण्यांत त्याचा पाय सर्वांच्या पुढें असे. आम्ही ज्या ठिकाणीं उभें होतों तेथून हत्ती खडक पंचवीस तीस फूट लांब होता. आम्ही जाईपर्यंत खडकाला चोहोंबाजूंनीं पुराचा चांगलाच वेढा पडला होता आणि पाणी चांगलेंच उसळया मारूं लागलें होतें. आमच्याखेरीज त्या ठिकाणीं पांच दहा कुण-ब्याच्या बाया उभ्या होत्या. त्या पूर येण्यापूर्वी तिथें धुणी धुवायला आलेल्या होत्या. विष्णु त्या दिवशीं कोणाकडे तरी जेवायला गेलेला होता. दोन वाजतां जेवून परत आल्यावर, तो शौचाला नदीच्या पलीकडे जाऊन आला आणि तपेलींत पाणी घेऊन हत्ती खडकावर सावकाशपणें हातपाय धूत बसला होता. इतक्यांत वरून पुराचा लोंढा आला. तो त्यानें डोळ्यांनीं चांगला पाहिला. आणि खालीं पात्रांत बाया धुणी धूत होत्या त्यांना त्यानें वरून ओरडून सांगितलें कीं, “बायानो, पाणी आलें, पळा!” तशा त्या बाया धुणी घेऊन कांठावर पळाल्या. पण विष्णु स्वतः हत्ती खडकावरून कांहीं हलला नाहीं. त्याचें हातपाय धुण्याचें काम अगदीं शांतपणें चाललें होतें. आणि मधून मधून तो गाण्याच्या तानाही पण मारीत होता

आम्ही काठांवर येऊन उभें राहिलों तसें विष्णूनें आमच्याकडे हंसून पाहिलें. आम्ही ओरडून म्हणालों, “विष्णूपंत, खालीं उडी टाका आणि पोहून या. अजून कांहीं पाणी फार चढलें नाहीं.” पण विष्णु अगदीं धिम्या स्वरांत ओरडला, “अरे, आतां इतक्यांत पाणी उतरेल. काळजी कशाला करतां! चांबळीचा

पूर जास्तींत जास्त किती टिकणार ? दोन अडीच तास ना ? आणि मी ह्या खडकावर उभा आहे. मला रे चांबळीच्या पुराचें काय भय ? " विष्णूचे ते थट्टेचे शब्द ऐकल्यामुळेंच कीं काय, चांबळी नदी त्या दिवशीं चांगलीच मनांतून संतापून गेली असावी. आणि कोणत्याहि पुरानें बुडून न जाण्याचा हत्ती खडकाचा गर्व एकदां जिरवून टाकण्याचेंच तिनें जणूं कांहीं ठरविलें असावें. त्या नंतर पुराचें पाणी असें कांहीं विलक्षण झपाट्यानें वाढत गेलें म्हणतां ! चार वाजतां आम्हीं तेथें आलेलों होतों. सहा वाजावयाच्या सुमारापर्यंत हत्ती खडकाचें टोक अवघें दोन फूटच वर राहिलें. इतका पूर एकसारखा वर वर चढत गेला. भोंवताली पाण्याचा अवाढव्य महासागरच पसरल्यासारखें दिसूं लागलें. खडकाभोंवार तर पाण्याचे असंख्य भोवरे निर्माण झाले आणि मोठमोठ्यानें आक्रोश करूं लागले. एवढ्या वेळांत विष्णु ब्रह्मे हत्ती-खडकावर पुरामध्यें अडकल्याची बातमी वणव्याप्रमाणें साऱ्या गांवांत पसरली आणि जो तो सोपान देवळाकडे धांवत सुटला. अर्ध्या पाऊण तासाचे आंत जवळ जवळ दोन तीन हजार लोक त्या ठिकाणीं कांठावर येऊन जमा झाले. पुराचें पाणी एकसारखें चढतच होतें. साडेसहाचे सुमारास हत्ती खडक साफ बुडाला तेव्हां मात्र लोकांनीं विष्णूच्या प्राणाची आशा साफ सोडली. पुराच्या प्रचंड आवाजामुळें विष्णूशीं बोलणेंहि त्यानंतर अशक्य झालें. गांवांत इतके लोक पट्टीचे पोहणारे होते पण तें ठिकाणच असें चमत्कारिक होतें कीं, तेथें पोहून जाणेंच मुळीं अशक्य होतें. काठ्या आणि दोर टाकूनही विष्णूला कांठावर ओढून आणणें

कठीण होतें. कारण पुराचें पाणी जसेंजसें वाढत गेलें तसे तसे कांठावरचे लोक मागें हटूं लागले आणि विष्णूच्या नि त्यांच्या-मधलें अंतर एकसारखें वाढत चाललें. साताचे सुमारास विष्णूच्या कमरेपर्यंत पुराचें पाणी चढलें. त्यानें आपल्या अंगावरचे कपडे पार फेकून दिले. गळ्यांतलें जानवेंहि काढून टाकलें. मागून पाण्याचा एवढा जोर असतांना सुद्धां तो तसा एकाद्या पोलादी पुतळ्याप्रमाणें आपल्या जागीं उभा होता. एक इंचभरहि तो पुढें हालला नाहीं. काठावर जमलेल्या लोकांच्या असहायतेला आणि दुःखाला कांहीं सीमाच राहिली नव्हती. शेकडों लोकांनीं देवाच्या प्रार्थना सुरू केल्या. संगमेश्वरला आणि सोपानदेवाला नवस केले. अनेक सुवासिनींनीं चांबळीची खणानारळांनीं ओटी भरून ती पुरांत फेकून दिली. विष्णूचा विधवा आई, भाऊ आणि चुलते तर हंबरडा फोडून रडत होते. त्याचें त्यावेळीं सांत्वन करणें कुणाला तरी शक्य होतें काय ? आम्ही लहान मुलें तर विष्णूकडे बघून स्फुंदून स्फुंदून रडत होतों. एवढेंच नव्हे तर विष्णूचे प्राण वांचावेत म्हणून सारें गांव त्या ठिकाणीं उभें राहून अश्रू ढाळीत होते. वाचकहो, एवढें हृदयद्रावक दृश्य मी माझ्या आयुष्यांत कधीं पाहिलें नसेल. अंधार पडूं लागला तसा पूर जास्तच वाढूं लागला. भोवऱ्यांतलें पाणी अधिक भेसूरपणें आक्रोश करूं लागलें. विष्णूचा सारा धीर सुटला. त्यानें साऱ्या गांवाला नमस्कार केला. साऱ्या गांवानें त्याला नमस्कार केला. इतक्यांत एक प्रचंड लोंढा मागून आला आणि विष्णूला तो सगळ्यांच्या डोळ्यासमोरून घेऊन निघून गेला. ‘ गेला ! गेला ! ’ अशा हजारो लोकांच्या

तोंडून एकदम दुःखाच्या आरोळ्या उठल्या आणि त्या आरोळ्यांमधून अधिक तारस्वरांत विष्णूच्या आईची हृदयभेदक किंकाळी वर उठली आणि सर्वांचीं हृदयें कापीत निघून गेली!

त्या रात्रीं सारें सासवड गांव जागें होतें. कोणालाहि झोंप येणें शक्य नव्हतें. रात्रभर पाऊसहि खूप जोरानें पडत होता. आणि वाराही मोठमोठ्यानें किंचाळत होता. पहाटें पहाटें लोकांच्या डोळ्याला डोळा लागला असेल. सकाळीं मात्र जेव्हां गांव जागें झालें तेव्हां ऊन पडलें होतें आणि पूर ओसरून गेला होता. जसें कांहीं काल गांवांत कांहींच घडलें नव्हतें. पुढें पुष्कळ शोध लोकांनीं केला पण विष्णूचें प्रेत कुठेंही सांपडलें नाहीं. रांजणडोहांतल्या आसरांनीं त्याला डोहांत ओढून गेलें आणि तेथें तो त्यांच्याबरोबर सुखानें संसार करीत आहे अशी पुष्कळ वर्षेंपर्यंत गांवकऱ्यांची समजूत होती. निदान त्याच्या म्हाताऱ्या आईचा त्यावर विश्वास होता. त्याच विश्वासावर म्हातारी पुढें चारदोन वर्षें जगली!



# समुद्राची देणगी

८

मुंबईपासून आठ दहा मैलावर समुद्राच्या कांठीं कांडवें नांवाचें एक खेडें आहे. खेडें तरी कसलें तें. असतील त्या ठिकाणीं पांच पन्नास कोळ्यांची किंवा भंडाऱ्यांचीं खोपटीं. नारळाच्या आगरांत लांब लांब अंतरावर इथें आणि तिथें दडलेलीं. सारीं खोपटीं मिळून दोनतीनशें लोकांची तरी वसति असेल की नाहीं याची शंका आहे. बाहेरून बघणाराला तर त्या वसतीचा मागमूस देखील लागायचा नाहीं. अगदीं एकाद्या आगरांतच पाऊल टाकलें, म्हणजे एकादा भंडारी नारळाच्या सोटावरून चढत किंवा उतरत असल्याचें दिसे आणि एकादा कोळी खांद्यावर जाळें टाकून आणि हातांत टोपली घेऊन समुद्राकडे चाललेला आढळें. मग बघणाराच्या मनांत विचार येई कीं, या ठिकाणीं कांहीं माणसें रहात असावींत बरें का. कांडव्याला खेडें म्हणण्यापेक्षां आगरच म्हटलेलें जास्त शोभेल. मैल दीड मैल विस्ताराचें तें एक मोठें आगरच होतें म्हणानात.

ताडामाडाच्या गर्द अंधुक सावलींत येथल्या लोकांचीं कामें नेहमीं स्वप्नांत वावरणाऱ्या माणसाप्रमाणें अगदीं शांतपणें आणि न बोलतां चाललेलीं असत. कधीं कसली बडबड नाहीं कीं गडबड नाहीं. कोळी अन् आग्री मासे मारीत. भंडारी नारळ अन् ताडी-माडी काढीत. आणि वरकड लोक भातशेती करीत. वर्षानुवर्षे त्यांचा हा जीवनक्रम न थांबतां अन् न बदलतां एकसारखा चाल-लेला असे. बाहेरच्या जगांत काय चाललेलें आहे, याची या लोकांना फिकीर नसे. आणि हे लोक काय करतात याची बाहे-रच्या जगाला परवा नसे.

कांडव्यापासून रेटस बंदर दोन अडीच मैल दूर आहे. मुंबईहून येणाऱ्या जाणाऱ्या बोटी कांडव्यावरूनच जातांना दिस-तात. कांडव्याच्या उजव्या बाजूला डोंगराचा एक फाटा आलेला आहे. आणि समुद्रामध्यें तो निमुळता होत होत गेला आहे. या डोंगरामुळेच कांडव्याजवळच्या दरियाच्या पाण्याची एक सुंदरशी खाडी बनलेली आहे. या खाडीचा तळ उथळ असल्यानें ओहटीच्या वेळीं किनाऱ्याची वाळू चांगली मैल दीड मैल आंत उघडी पडत असे. आणि मग तिचा एकजात सपाट आणि सफेत विस्तार सूर्याच्या किरणांत चमकूं लागला कीं, त्याजवर कोणीतरी मोत्याचा चूर पिसकरून ठेवला आहे असें वाटे. या खाडीमुळेंच कांडव्यांचा किनारा मोठा शोभिवंत दिसत असे. मैल दीड मैल तरी त्याची लांबी असेल. बीजेच्या कोरीसारखा तो रेखीव, बांक-दार आणि शुभ्र दिसे. त्या समुद्रकांठच्या दहा वीस मैलांच्या पट्टींत तरी इतका सुरेख आणि मोहक किनारा दुसरीकडे पहाव-

याला मिळाला नसता. कांडव्याचें खरें सौंदर्य म्हणजे हा किनाराच. समुद्राकडच्या बाजूनें कांडव्याकडे बघितलें म्हणजे डोंगरावर डोकें ठेवून नारळीच्या हिरव्यागार झावळ्यांची दुलई अंगावर घेऊन आणि पोटाशी पाय मुडपून समुद्राच्या गार वाऱ्यांत झोंपी गेलेल्या लहान मुलासारखें तें दिसत असें. खरोखर, कांडवें बाजुला पडलें म्हणून. नाहींतर त्याचें सौंदर्य दृष्ट लागण्यासारखे होते. कधीं कोणी एकादा चांगला माणूस चुकून कांडव्याला आला आणि तो तेथलें शांत आणि रमणीय वातावरण पाहून मोहीत होऊन गेला नाहीं असें क्वचितच होई. रूबेन ॲरान चेरीकर यांचें असेंच झालें. अबकारी खात्यामधले ते एक सामान्य अधिकारी होते. तपासणीच्या कामाच्या निमित्तानें त्यांना एकदां कांडव्यावरून जावें लागलें. त्यांनीं तो किनारा पाहिला मात्र. त्यांचें कामधाम पार बाजूला राहिलें. आणि तब्बल दोन रात्रीं अन् एक दिवस त्यांनीं तेथें घालविला. आणि तेव्हांपासून त्यांना कांडव्याचें वेडच लागलें म्हणतात.

दर दोन तीन महिन्यांनीं चार दोन दिवसांची रजा काढून रूबेन साहेब आपले कांडव्याला यावयाचे. आणि किनाऱ्यालगत असलेल्या एका आगरामधल्या भंडाऱ्याच्या मांडवांत ते आपला मुक्काम ठेवायचे. कांडव्याला ताडी फार उत्तम मिळत असे. रूबेन साहेबांना माडीचा विशेष षोक नव्हता. पण कांडव्याला आलें म्हणजे भंडारी त्यांना अगदी ताजी ताडी झाडावरून काढून देई. कांडव्याच्या खाडींत एक विशिष्ट तऱ्हेचा मासा मिळत असे. असा चवदार मासा रूबेन साहेबांनीं जन्मांत कधीं चाखला नव्हता. एका

बाजूला ताडीचें मडकें आणि समोर भंडाऱ्यानें खास मसाल्यांत तळलेल्या खमंग माशांची चवड ठेवून रूबेन साहेब समुद्राकडे तोंड करून सकाळीं दहा अकराच्या सुमारास एकदां बैठक मारून बसले म्हणजे दिवस कसा निघून जाई आणि रात्र कधीं येई याचा त्यांना पत्ता नसे. त्यांतून चांदणी रात्र असली म्हणजे तर कांहीं विचारूं नका. किनाऱ्यावर एकामागून एक धडाधड आदळणाऱ्या लाटांचा उन्मत्त घोष ऐकत आणि त्यांच्या फेसाळ तुषारांचा गारवा अंगावर घेत ते सारी रात्र किनाऱ्याच्या वाळवंटावर बेहोष पणें पडून घालवीत असत. रूबेन साहेबांना आयुष्यांत तसा कांहीं पाश नव्हता. त्यांचें वय चांगलें पन्नाशीच्या घरात येऊन ठेपलें होतें. तरी ते अविवाहितच होते. लहानपणापासून कसरत करण्याचा त्यांना विशेष नाद होता. त्यामुळें त्यांची प्रकृति चांगली तगडी झाली होती. त्यांच्या भव्य आणि गोऱ्या कपाळावरचे केस थोडेसे पिकूं लागले होते इतकेच. नाहीं तर त्यांच्या नुसत्या चेहेऱ्यावरून त्यांची चाळीशी देखील उलटली नसावी असेंच पहाणाराला वाटे. रूबेन साहेबांचें आयुष्य तसें एकमार्गी होतें. वृतीनें ते थोडेसे रुक्षच होते. नोकरीच्या कामापलिकडे त्यांच्या डोक्यांत बहुधा कशाचाच विचार नसे. पण कांडव्याचा शोध लागल्यापासून मात्र त्यांच्या वृत्तींत एकदम फरक पडला. माणसाला एकाद्या गोष्टीची चटक लागावी ना, तसा कांडव्याचा रूबेन साहेबांना नादच लागून राहिला. आणखीन चार-पांच वर्षांनीं पेन्शन घेतल्यावर तेथल्या किनाऱ्यालगत थोडीशी जागा खरेदी करून एक लहानशी बंगली बांधावयाची व तिथेंच स्थायिक व्हावयाचें

असा त्यांनीं ठाम निश्चय करून टाकला.

पण ज्या वेळीं त्यांनीं हा निश्चय केला, त्यावेळीं तो तडीस कसा जाईल याचा मात्र त्यांनीं मुळींच विचार करून ठेवला नव्हता. कांडव्याच्या किनाऱ्यावरची जागा खरेदी करून तेथें छानदारशी बंगली बांधण्याइतकी कांहीं रूबेन साहेबांची सांपत्तिक स्थिती चांगली नव्हती. तीस वर्षें नोकरी करूनही त्यांचा महिन्याचा पगार दोनशापेक्षां कांहीं जास्त नव्हता. रूबेन साहेबांची राहणी तशी सढळ होती. आणि त्यांना कपड्याची विशेष आवड होती. त्यामुळें त्याच्या पगारांतली फारच थोडी रक्कम महिन्याअखेर शिल्लक रहात असे. मग कांडव्याच्या किनाऱ्यावर बंगली बांधण्यांचें त्यांचें स्वप्न ते कशाच्या आधारावर खरें करून दाखवणार होते ? पण पुष्कळ वेळां माणसाच्या आयुष्यांत असे कांहीं योगायोग येतात कीं, त्याच्या मनताले बेत त्याच्या अपेक्षेपेक्षां लौकर सफळ होऊन जातात. रूबेन साहेबांच्या बाबतींत अगदीं तसेंच घडलें. कांडव्याला ज्या भंडाऱ्याच्या झोपडींत ते मधून मधून येत, तो असाच एकदां अबकारी गुन्ह्यामध्यें अचानकपणें सांपडला. त्या भानगडीमधून त्याला रूबेन साहेबांनीं सही सलामत वांचवलें. त्या उपकाराची फेड म्हणून त्यानें आपल्या आगरांतला समुद्रालगतचा एक बराच मोठा तुकडा रूबेन साहेबांना थोडक्याशा किंमतीमध्यें देऊन टाकला. म्हणजे ती जागा त्यांना जवळ जवळ फुकटांतच पडली म्हणानात. हें होत आहे नाहीं तोंच पन्नास वर्षांच्या वयापर्यंत रूबेन साहेबांच्या आयुष्यांत जी गोष्ट कधीं घडली नाहीं, ती एकाएकी घडून आली. म्हणजे त्यांच्या

लग्नाचा योग जमून आला. आणि त्यामुळें त्यांच्या आयुष्यांतले बाकीचे प्रश्न आपोआपच एकदम सुटले. चांगल्या गोष्टी देखील आयुष्यांत एकदां येऊं लागल्या म्हणजे त्या झुंडीनें येतात.

म्हणजे तें असें झालें. रूबेन साहेब इतकीं वर्षें जे अविवाहित राहिले होते त्याला एक कारण होतें. खानसाहेब सालोमन मोझेस तरणखोपकर हे त्यांचे मामा. फार मोठ्या पगारांचे ते एक सरकारी अधिकारी होते, रेचेल ही त्यांची एकुलती एक मुलगी. तिच्यावर रूबेन साहेबांचे अगदीं लहानपणापासून प्रेम बसलें होतें. पण मॅट्रिक परिक्षेंत दोन तीन वेळीं टक्के खाऊन रूबेन साहेब जेव्हां अबकारी खात्यांत महिना पंचवीस रुपये पगारावर नोकरीस लागले, तेव्हां रेचेलशीं त्यांचें लग्न होण्याची शक्यता पार नाहींशी झाली. अगदीं भाचा झाला म्हणून काय झालें ? असला अशिक्षित आणि दरिद्री जावई खानसाहेब सालोमन यांच्यासारख्या प्रतिष्ठित आणि श्रीमंत गृह-स्थाला कसा परवडूं शकला असता ? पण त्यामध्यें एक गोष्ट अशी होती कीं रेचेलचेही मनांतून रूबेनवरच प्रेम होतें. रूबेनशीं लग्न होणें शक्य नाहीं असें पहातांच तिनें त्या गोष्टीचें नांवच सोडून दिलें. आणि अभ्यासाच्या भोवऱ्यांत तिनें आपलें प्रेम आणि मनांतले सारे बेत बुडवून टाकले. इतके कीं जशी ती मुळीं त्या गांवाचीच नव्हती. बी. ए. बी. टी. झाल्यावर तिनें सरळ माझगांवच्या बेने-इस्रायल मुलींच्या शाळेंत शिक्षकिणीची नोकरी पत्करली. घरची एवढी श्रीमंती असतांना लग्न न करतां रेचेल नोकरी करीत कां बसली आहे, हें न समजण्याइतके रूबेन साहेब कांहीं मठ्ठ बुद्धीचे नव्हते. त्यांनींही तिच्यासाठीं अविवाहित

रहाण्याचा निश्चय करून, स्वतःचें आयुष्य नोकरीच्या व्यवधाना-मध्यें गुंतवून टाकले. दोघांच्या आयुष्यातली ऐन उमेदीचीं आणि तारुण्याचीं अनेक वर्षेंच्या वर्षें निष्फळ वैतागामध्यें अशा तऱ्हेनें वाया गेली. पण प्रत्येक गोष्टीला कुठें ना कुठें तरी शेवट असतो. रूबेनसाहेबांनीं कांडव्याची जागा घेऊन एक आठवडा झाला नसेल तोंच खानसाहेब सालोमन मोझेस तरणखोपकर हे वयाच्या शहात्तराव्या वर्षीं पुणें येथें नानापेठेतल्या आपल्या रहात्या घरीं मरण पावले. त्यानंतर महिन्याच्या आंतच रेचेलनें आपल्या नोकरीचा राजिनामा दिला. आणि रूबेन साहेबांनीं आपली नौकरी पुरी होण्याच्या आधींच पेनशन घेतली. कांडव्याच्या बंगल्याचें काम तिकडे ज्या दिवशीं सुरू झालें त्याच दिवशीं पुण्याच्या सिनेगॉग-मध्यें इकडे दोघांचें लग्न लागलें. बंगला पुरा होऊन दोघे कांड-व्याला रहावयाला गेले तेव्हां रेचेलबाईंना ‘ सहावा महिना ’ सुरु झाला होता.

त्यागाच्या असह्य उन्हाळयांत मनाच्या मांडवामध्यें अश्रूंचें शिंपण घालून इतक्या जपणूकीनें वाढविलेल्या दोघांच्या प्रेम-वेलीला अनेक वर्षांनीं आलेलें सॅरा हें एक अतिशय सुंदर फूल होतें. समुद्रावर होणाऱ्या सूर्योदयापूर्वीच्या आकाशाप्रमाणें तिचा चेहरा तांबूस आणि तेजस्वी होता. आणि समुद्रांत बुडणाऱ्या सूर्यबिंबाच्या मावळत्या किरणांप्रमाणें तिचे केस कोमल आणि सोनेरी होते. दुपारच्या वेळीं किनाऱ्यावरून लांबवर दिसणाऱ्या दरियाच्या पाण्याप्रमाणें तिच्या डोळ्यांचें तेज निळेभोर होतें. आणि समुद्राच्या लाटांचें अवखळ हास्य तिच्या प्रत्येक हास्यांत

आणि हालचालीमध्यें भरलेलें होतें. आपल्या बंगल्यासमोरील किनाऱ्यावर चिमुकल्या सॅराला घेऊन रोज सकाळीं जेव्हां रूबेन साहेब उभे रहात, तेव्हां त्यांच्या पायापाशीं आदळणाऱ्या लाटांकडे आणि कडेवर खिदळणाऱ्या सॅराकडे बघून त्यांचें अंतःकरण आनंदानें भरून येई. आणि 'ही समुद्राची देणगी आहे' असें पाठीमागें वाळूंत आरामखुर्चीवर सॅराचीं झबलीं विणीत बसलेल्या रेचेलबाईंना ते सद्गदित कंठानें सांगत. जीवनांत सॅरा आल्यापासून इतकीं वर्षें सहन केलेल्या साऱ्या मानसिक आपदा दोघेही नवराबायको अजिबात विसरून गेलीं. उचंबळत्या कारंज्याच्या पाण्यानें हौद भरून जाऊन पाणी कांठावरून खालीं सांडूं लागावें, तसें सॅराच्या अचपळ लीलांनीं त्यांच्या जीवनामधला आनंद अगदीं काठोकाठ भरून वाहूं लागला. सॅरा जशी मोठी होऊं लागली तशीं वर्गामधल्या तीस पस्तीस मुली आवरतांना रेचेलबाईंना जितके श्रम पडले नाहींत तितके तिला एकटीला सांभाळतां सांभाळतां त्यांना पडूं लागले. आणि किनाऱ्यावर लाटांच्या मागून मोठमोठ्यानें किंचाळत धांवणाऱ्या चिमुकल्या सॅराला पकडतांना रूबेन साहेबांना इतकी धांवपळ करावी लागे कीं, आपल्या तीस वर्षांच्या अबकारी खात्यामधील नोकरीमध्यें त्यांनीं तितकी धावपळ कधीं केलेली नसेल. पुढें पुढें सॅराला सांभाळणें म्हणजे तिच्या मागून एकसारखें धांवत सुटणें असाच त्याचा अर्थ झाला. फक्त निजायच्या वेळींच ती तेवढी घरांत असे. नाहीं तर बाकीचा सारा वेळ ती नारळाच्या आगरांतून आणि किनाऱ्याच्या वाळूवरून एकसारखी हुदडत असे. नारळाच्या झाडावरून

गळून पडलेली चिमुकली शहाळी हे तिचे मित्र. आणि किनाऱ्यावर सापडणाऱ्या अनेक लहान मोठ्या शिंपा या तिच्या मैत्रिणी. त्यांच्याशीं खेळतां खेळतां कांडव्यांच्या किनाऱ्यांवर सॅरा लहानाची मोठी झाली. रूबेनसाहेब म्हणत होते तें खरें होतें. सॅरा ही खरोखर समुद्राचीच देणगी होती.

रेचेलबाई एवढया सुशिक्षित. बी. ए. बी. टी. झालेल्या. पण सॅरा चांगली चौदा वर्षांची होईपर्यंत तिला शाळेंत घालण्याचा विचारही कधीं त्यांच्या डोक्यांत आला नाहीं. कारण सॅराला शाळेंत पाठवायची म्हणजे तिला कांडव्याहून मुंबईला धाडून द्यायची. तिला आपल्यापासून दूर ठेवायची. तिच्यावांचून आपण एकटे कांडव्याला रहावयाचें, हा विचार देखील त्यांच्या किंवा रूबेनसाहेबांच्या अंतःकरणाला सहन होण्यासारखा नव्हता. त्यांनीं तिला घरीं बसल्या बसल्याच जेवढें शिकवितां येईल तेवढें शिकविलें. पण शिकायला सॅरा निश्चळपणें एका जागीं कधीं सांपडेल तर तिला शिकवायचें कीं नाहीं? घरांत आईबाप तिच्याशीं नेहमीं इंग्रजीमधूनच बोलत. त्यामुळें मराठीप्रमाणें इंग्रजी ही सॅराची जवळ जवळ मातृभाषाच झालेली होती. इंग्रजी लिहितां वाचतां देखील तिला चांगलें येत असे. पण बाकीच्या विषयांची मात्र तिला बिलकूल गोडी नव्हती. सॅरानें पुष्कळ शिकावें आणि आपल्याप्रमाणें पदवीधर व्हावें, असें रेचेलबाईंना मुळींच वाटत नव्हतें. कारण आपल्याला मनाप्रमाणें लग्न करतां येत नव्हतें, म्हणूनच आपणाला नाइलाजानें शिकावें लागलें, याची त्यांना जाणीव होती. त्यामुळें शिक्षणाबद्दल त्यांना एक प्रकारचा उबगच आलेला होता. त्यांच्या

एका गरीब मैत्रिणीचा आयझॅक म्हणून एक मुलगा होता. फार देखणा आणि हुषार होता तो. मुंबईच्या झेविअर कॉलेजमध्यें ज्यूनियर बी. ए. च्या वर्गांत शिकत होता. त्याच्या शिक्षणाचा सर्व खर्च रेचेलबाईच देत होत्या. बी. ए. किंवा एम्. ए. झाल्यावर त्यालाच आपला घरजावई करून कांडव्याला आणून ठेवायचा असें रेचेलबाईनीं आपल्या मनाशीं ठाम ठरवून ठेविलें होतें. म्हणून सॅराला शाळेंत घालण्याच्या बाबतींत त्या एवढ्या उत्सुक नव्हत्या. पण पुढें एक घटना अनपेक्षितपणें अशी घडून आली कीं ज्या शाळेंत रेचेलबाई शिक्षकीण होत्या, त्या शाळेच्या मुली आणि मास्तरणी 'पिकनिक' साठीं म्हणून एक दिवस कांडव्याला आल्या. त्या मुलींचे आकर्षक गणवेष, त्यांचे खेळ आणि गाणीं बघून सॅरा इतकी मोहित होऊन गेली कीं त्यांच्या बरोबरच मुंबईला आपण त्यांच्या शाळेमध्यें जाणार असा ती हट्टच धरून बसली. तो हट्ट न पुरवणें तिच्या आईबापांच्या अगदीं आवाक्याबाहेरचें होतें. अशा तऱ्हेनें अगदीं अचानकपणें सॅरा मुंबईच्या शाळेमध्यें जाऊन दाखल झाली.

मागला सारा अभ्यास भरून काढून अवघ्या तीन वर्षांच्या आंतच सॅरा मॅट्रिकच्या वर्गांत येऊन पोहोंचली. शाळेच्या वाता-वरणांत गेल्यापासून तिच्या वेषांत आणि वागण्यांत एकदमच फरक पडला. त्यांत वाढत्या वयाची भर पडल्यानें ती अतिशयच आकर्षक दिसूं लागली. साऱ्या शाळेंत तिच्याइतकी मोहक आणि प्रभावी व्यक्तिमत्व असलेली दुसरी मुलगी नव्हती. तिच्या आईबापांना तर तिला कुठें ठेवूं अन् कुठें न ठेवूं असें होऊन गेलें.

ह्या तीन वर्षात मुंबईला त्यांच्या किती चकरा झाल्या असतील, त्याची गणती करतां आली नसती. आणि दर हिवाळयाच्या आणि उन्हाळ्याच्या सुट्टींत सॅरा कमींत कमी पांचसहा मैत्रिणी घेऊन कांडव्याला आली नाहीं असेंही पण कधीं झालें नाहीं महायुद्ध सुरू होऊन यावेळीं दोन वर्षें होऊन गेलीं होतीं. सॅराची मॅट्रिकची परीक्षा संपली. आणि ती एक दोन दिवसांनींच कांडव्याला जाणार होती. इतक्यांत एके दिवशीं तिच्या शाळेंतली एक मैत्रीण ' वॅकाय ' W. A. C. ( I ) मध्यें होती. तिनें आपल्या पार्टीला सॅराला बोलावलें. अर्ध्या कापलेल्या सोनेरी केसांची, गोरीपान, उंचीपुरी, हंसतमुख अशी सॅराची ती आकर्षक मूर्ति पाहून ' वॅकाय 'ची इंग्रज अधिकारी बाई तिच्यावर इतकी लुब्ध होऊन गेली, कीं भेटल्यापासून एका तासाच्या आंत तिनें ' वॅकाय ' मधलें एक कमिशन सॅराला स्वखुषीनें पत्करायला लावलें. आपण कोठल्या जगांत आहोंत हेंच सॅराला कळेना. एका अद्भुतरम्य आनंदानें तिचें डोकें अक्षरशः फिरून गेलें. आपण मॅट्रिकला बसलों आहोंत, आपल्याला दुसऱ्या दिवशीं कांडव्याला आपल्या आईबापांकडे जावयाचें आहे, या साऱ्या गोष्टी ती विसरून गेली. वॅकायमध्यें कमिशन पत्करून आपण उत्तर हिंदुस्थानांत जात आहोंत हें तिचें पत्र रूबेन साहेबाच्या हातीं जेव्हां पडलें, तेव्हां ती नव्या दिल्लींत आपल्या कामावर दाखल देखील होऊन गेलेली होती.

त्या दिवसापासून जवळ जवळ एक महिनापर्यंत रेचेल बाईच्या तोंडून एक अक्षर देखील बाहेर पडलें नाहीं. रूबेनसाहेब

हे आपल्या भावना शब्दानीं बोलून दाखविणारे नव्हते. पण सॅराच्या या अनपेक्षित कृतीनें त्यांच्या हृदयाला किती धक्का बसला, तें त्यांच्या 'पाईप' च्या आवाजावरून लक्षांत येईल. बंगल्याच्या वऱ्हांड्यांत ते आपली पाईप तोंडांत धरून तिचा जोराजोरानें रटरट असा जेव्हा आवाज काढीत एकटे बसत, तेव्हां त्याचें हृदय सॅराच्या आठवणीनें कसे खदखदून शिजत असलें पाहिजे ते समजून येई. तथापि, ही दोघांची व्याकुळ मनःस्थिती फार दिवस टिकूं शकली नाहीं. कारण महिना दोन महिने लोटल्यावर दर आठवड्याला अगदीं नियमितपणें सॅराचीं पत्रें त्यांना येऊं लागलीं. इतक्या सुरेख अक्षरांत आणि सुंदर भाषेंत तीं पत्रे लिही आणि आईबापावर असलेले आपलें गाढ प्रेम ती इतक्या तळमळीनें आणि प्रेमळपणानें व्यक्त करी कीं तिच्यावरचा सारा राग दोघेही जण कधींच विसरून गेले. प्रत्येक पत्रात आपले निरनिराळे आकर्षक फोटो सॅरा पाठवून देत असे. त्यामुळें आपल्याला सोडून ती दूर गेली आहे असें काहीं काळानें त्या दोघांना जवळ जवळ वाटेनासेच झाले. रूबेन साहेबानीं सॅराचीं पत्रें मोठमोठ्यानें वाचून दाखवावींत, आणि नेत्रामधून कौतुकाच्या अश्रूंच्या धारा गाळीत रेचेल बाईनीं तीं शांतपणें ऐकावींत हा त्या दोघांचा नित्याचा व्यवसायच होऊन बसला. पांच वर्षांमध्यें सॅराचीं शेंकडों पत्रें आणि फोटो त्यांना आले असतील, वर्षामधून निदान महिना पंधरा दिवसांची रजा घेऊन एकदां तरी आपल्याला भेटायला ये, म्हणून रूबेन साहेबांनीं तिला अनेक वेळां आर्जवानें लिहिलें. पण सॅराच्या हुषारीमुळें मोठमोठ्या जबाब-

दारींचीं कामें एकसारखीं तिला मिळत राहिल्यानें, त्या पांच वर्षा-मध्ये एकदां देखील तिला रजा घेऊन घरीं यावयाला सवड मिळाली नाहीं. सॅरा गेल्यानंतर रेचेलबाईची प्रकृतिही तशी हळू-हळूं पुष्कळच ढासळली होती. बहुतकरून त्या एके ठिकाणींच पडून असत. म्हणून त्यांना घेऊन किंवा त्यांना सोडून सॅराला भेटावयाला तिच्या नोकरीच्या ठिकाणीं इतक्या लांब जाणेंही रुबेन साहेबांना शक्य नव्हते. ज्या दिवशीं लढाई संपेल त्याच्या दुसऱ्या दिवशीं मीं कांडव्याला तुम्हाला भेटायला आलेच म्हणून समजा असे अनेक वेळां सॅरानें आपल्या वडिलांना पत्रांमधून कळविलें होतें. म्हणून कधीं एकदाची लढाई संपते आणि कधीं सॅराचे दर्शन पुन्हां आपल्याला घडतें असे दोघांना होऊन गेलें होतें. शेवटीं पंचेचाळीस सालचा ऑगस्ट महिना एकदाचा उगवला. आणि यूरोपांतलें महायुद्ध संपलें. ज्या दिवशीं युद्ध संपल्याची घोषणा झाली त्याच्या दुसऱ्याच दिवशीं रूबेन साहेबाच्या हातांत सॅराची तार पडली. रूबेनसाहेबांनीं ती तार मोठ्यानें वाचली. ती ऐकून रेचेलबाईना एकदम अर्धांग वायूचा भयंकर झटका आला. आणि तशा स्थितींत त्यांना एकटे टाकून संतापानें लाल झालेले रूबेन साहेब अडीच मैल पायीं चालत चालत रेटस बंदरावर गेले. आणि तेथून त्यांनीं सॅराला उलट तांतडीची तार केली कीं ‘ यापुढें जन्मात तूं आम्हांला भेटायला येऊं नकोस ! ’ कॅप्टन स्पार्किंग नांवाच्या एका गोऱ्या लष्करी अधिकाऱ्याबरोबर आधल्या दिवशींच आग्रा येथें सॅराचा विवाह झालेला होता. आणि त्याला घेऊन आपण लौकरच भेटा-

यला येतों अशी तार सॅरानें आपल्या वडिलांना केलेली होती

त्या दिवसापासून रेचेल बाईची पाठ कायमची अंथरूणाला लागली. त्यांचें सारें शरीरच लुळें पांगळे होऊन गेलें. त्यांना हालता येत नव्हतें की बोलतां येत नव्हतें. रूबेन साहेबांनी सॅराचीं सारी पत्रें आणि फोटो गोळा केले. आणि त्याचें गाठोडें बांधून एका कोळयाला लांब समुद्रात नेऊन तें बुडवायला सांगि-तलें. रेचेलबाईची स्थिती आतां एकाद्या लहान मुलासारखी झालेली होती. सकाळपासून संध्याकाळपर्यंत त्यांची सारी सेवा करणें आणि त्यांचे कष्ट उपसणें हे बहात्तर वर्षाच्या वृद्ध रूबेन साहेबांना कसें शक्य होतें ? शिवाय रेचेल बाईच्या नजरेला नजर देणें हें कांहीं सोपे काम नव्हतें, एकसारख्या त्यांच्या डोळयातून पाण्याच्या धारा वहात असत. तें दृश्य बघणें रूबेन साहेबाना अगदी अशक्य होतें, म्हणून त्यांनीं आयझॅकला व त्याच्या आईला बोलावून घेतलें. रेचेल बाईवर दोघांची अतिशय माया होती. दिवसभर तीं मायलेकरें तिच्या बिछान्यापाशीं बसून तिच्या साऱ्या खस्ता काढीत. आणि बाहेर व्हरांड्यांत एका टेब-लावर ताडीची बाटली आणि ग्लास ठेवून झिंगलेले रूबेन साहेब पाईप ओढीत आणि शुन्य नजरेनें समुद्राकडे पहात तासन् तास एकटे बसलेले असत. दिवसांतून एकदाच ते जेवत. आणि ते देखील आयझॅकनें त्यांना हलवून हलवून जागे केले म्हणजेच. लग्न झाल्यापासून गेल्या बावीस वर्षात रूबेन साहेबांनीं ताडीच्या थेंबाला देखील कधीं स्पर्श केला नव्हता. पण आतां त्यांना ताडीखेरीज दुसरा कशाचाही आधार नव्हता. ताडीच्या कैफा-

तून जागें होऊन जीवनाकडे पहाण्याची आतां त्यांना इच्छा नव्हती. त्या निशेंतच कधीं आपल्याला सुखाचें मरण येतें आहे याची ते वाट पहात बसले होते. अशा परिस्थितींत दोन वर्षे कधीं निघून गेलीं हें त्याना कळलेंच नाहीं. पावसाळा सुरू झाला. किनाऱ्यावरचीं ताडामाडाचीं झाडं मोठमोठ्यानें झोके खाऊं लागलीं. समुद्राच्या लाटांशीं वारा उन्मत होऊन दंगामस्ती करूं लागला. आणि एका अशाच वादळाच्या रात्रीं रेचेलबाईचा निर्जीव श्वासोच्छ्वास ऐकूं येईनासा झाला. त्याच्या जीवनाची इतकीं वर्षे मंदपणें जळत असलेली ज्योत रात्रीं कधीं मालवली हें कोणाला कळलेंच नाहीं. त्याच्या मरणानंतर दुसऱ्याच दिवशीं अगदीं अनपेक्षितपणें सॅराचें पत्र आलें. त्यात तिचा एक ताजा फोटो होता. आपल्या एक वर्षाच्या सुंदर बाळसेदार मुलाला हातांनीं हृदयाशीं उचलून धरून सॅरा हंसत उभी आहे असा तो फोटो होता. आपण सध्यां मुंबईला आलेले असून लौकरच आपण तिघेही जण सहा महिन्यासाठीं युरोपमध्ये जाणार आहोंत आणि म्हणून जाण्यापूर्वीं तुम्हां दोघांना भेटण्याची आणि चिमुकल्या सॉलोमनला एकदा तुमच्या मांडीवर ठेवण्याची आपल्याला उत्कट इच्छा आहे, असें तें सॅराचें पत्र होतें. सॅराचा आणि तिच्या मुलाचा तो फोटो हृदयाशीं धरून सारी रात्र रूबेन साहेब रडत होते. दुसरे दिवशीं सकाळीं त्यांनीं आयझॅकला सांगितलें कीं, ' आतांचे आत्ता जाऊन तूं सॅराला तार कर. आणि तिला कळव कीं तुझी आई गेली. तिची आणि तुझी भेट होणें आतां शक्य नाहीं. पण डोळे मिटण्यापूर्वी तुला आणि तुझ्या मुलाला

पोट भरून एकदा बघण्याची तुझ्या म्हाताऱ्या बापाची मात्र इच्छा आहे. ' घशांत आलेला आवंढा कष्टानें गिळून आयझॅक तार करायला घाईघाईनें रेटसला निघून गेला.

मुंबईला आपण पुढल्या मंगळवारीं येत आहोंत आणि लागलेच गुरुवारच्या सकाळच्या बोटीनें आपण मुंबईहून रेटसला येऊं असा सॅराकडून त्या तारेचा तावडतोब जबाब आला. त्या दिवसापासून रूबेनसाहेबांनीं ताडी पिण्याचें बंद केलें. बायकोच्या मरणाचें दुःख तर त्यांच्या अंतःकरणांत ताजें होतेंच. पण इतक्या वर्षांनीं सॅरा आपल्याला भेटायला येणार या कल्पनेनें त्यांना इतका आनंद झाला होता, कीं त्या आनंदाच्या भरांत ते आपलें दुःख तात्पुरतें विसरल्यासारखेंच झाले. आयझॅकनें आणि त्यांनीं मिळून सारा बंगला आणि भोवतालचें आवार झाडून साफसूफ करून टाकलें. सॅराचा नवरा इंग्रज आहे. त्याला आपल्या घरात यत्किंचितही गांवठीपणा किंवा गबाळपणा दिसता कामा नये असें रूबेनसाहेबांनीं आयझॅकला अगदीं बजावून बजावून सांगितलें. घरांत काटे चमचे आणि चिनी मातीच्या प्लेटी किती वर्षें तरी धूळ खात पडलेल्या होत्या त्या रूबेनसाहेबांनीं घासून पुसून स्वच्छ करून ठेवल्या. हॉलमधल्या डिटमारच्या दिव्याची चिमणी फुटून कितीतरी दिवस झाले होते. त्या चिमणीची काच त्यांनीं आयझॅकला मुंबईला पाठवून नवीन विकत आणवली. त्यांचा लोकरी सूट कपाटांत अनेक वर्षें कुबट होऊन पडला होता. त्याला दिवसभर व्हरांड्यांत मोकळा टांगून त्यांनीं स्वतः हातांनीं इस्त्री केली. बुटावर किती वर्षांची धूळ सांचली होती. ती काढून

त्यांनीं त्याला चकचकीत पॉलिश केलें. एवढें सगळें होतां होतां मंगळवार गेला आणि बुधवार देखील उजाडला. दुपारीं त्यांनीं आपल्या नेहमींच्या नालू कोळ्याला हांक मारली. आणि 'उद्यां सेरा बाबा येणार आहे. खाडींतले चांगले ताजे मासे सकाळींच काढून आण' असें त्याला सांगितलें. दिवसभर हवा चांगली होती. पण संध्याकाळीं मात्र पाऊस एकदम जोरानें पडायला सुरवात झाली. उद्यां सकाळीं सेरा येणार अन् पावसानें काय हा रात्रीं चावटपणा सुरू केला आहे, अशा चिडलेल्या नजरेनें बाहेर पहात रूबेन साहेब व्हरांड्यांत उभे होते. इतक्यांत पावसानें निम्माशिम्मा भिजलेला नालू गंभीर चेहरा करून आणि मान खालीं घालून त्यांच्यासमोर आला. तो हलक्या स्वरांत म्हणाला, "बाबा, वादळ सुरू झालंय. फार खराब दिसतंय. उद्यां सकाळीं मासे नाहीं मिळायचे." रूबेनसाहेब एकदम त्याच्यावर उखडले. "हें वादळ काय रात्रभर टिकतें होय रे? तुम्ही लोक म्हणजे असेच रडके! जा, सकाळीं हवा चांगली होईल!" नालू न बोलतां निघून गेला. पण रूबेन साहेबांना आंतून कांहीं तरी चमत्कारिक वाटूं लागलें. रात्र जशी जशी होऊं लागली तसा वादळाचा जोर कमी होण्याच्या ऐवजीं वाढतच चालला. दर तासा तासानें रूबेन साहेब आंथरूणावरून उठून बाहेर व्हरांड्यांत येत. आणि गडद काळोखांत भेसूरपणें गरजणाऱ्या लाटांकडे आणि घोंघावणाऱ्या वाऱ्याकडे ते डोळे फाडून फाडून बघत. सारी रात्र त्यांच्या डोळ्याला डोळा लागला नाहीं. सकाळीं पांचाच्या सुमारास मात्र व्हरांड्यातल्या आरामखुर्चीवर त्यांना

बसल्या बसल्या एकदम झोप लागली. त्यांनीं पुन्हां जेव्हा डोळे उघडले तेव्हां घडयाळांत आठ वाजले होते.

वादळ थाबलें होतें. समुद्र अगदीं शांत झाला होता. उन्ह दिसत नव्हतें, पण उजेड स्वच्छ पडला होता. आणि मधून मधून पावसाची बारीकशी झिमझिम चालू होती. रुबेनसाहेबांनीं एक-वार समुद्राकडे दृष्टि टाकली आणि समाधानाचा निःश्वास टाकून ते लगबगीनें उठले. कारण रेटसला जाण्यासाठीं गडयानें घोडयाचा टांगा जोडून तयार ठेवला होता. घाईघाईनें दाढी करून आणि नवे कपडे घालून चहा न पिता तसेच रुबेनसाहेब टांग्यांत बसले. रेटसला ते पोहोंचेपर्यंत पावणेनऊ वाजले. मुंबई-कडची बोट यायला फक्त अर्ध्या तासाचा अवकाश होता. बंदरावर पांच पंचवीस माणसें इकडून तिकडे उगाच हिंडत होतीं." काय, आजची हवा कशी काय आहे ?" रुबेन साहेबांनीं तेथल्या एका म्हाताऱ्या नाखव्याला कांहीं तरी विचारावयाचें म्हणून विचारलें. नाखव्यानें उजव्या बाजूला मुंबईच्या दिशेकडे बघितल्या न बघितल्यासारखें केलें आणि "बरी दिसते आहे." असें तोंडां-तल्या तोंडांत काहींतरी उत्तर देऊन तो निघून गेला. अगदीं फार उशीर झाला तरी बोट दहा वाजेपर्यंत ही आलीच पाहिजे. पण दहा वाजले, अकरा वाजले, चांगले बारा वाजायची वेळ आली तरी बोटीचा पत्ता नव्हता. बंदरावरच्या माणसाचे चेहेरे चिंता-तुर दिसूं लागले व हलक्या आवाजांत तीं एकमेकांशीं काहीं तरी कुजबुजूं लागलीं. इतका वेळ झाला तरी बोट कशी आली नाहीं म्हणून तपास करण्यास आयझॅक पायीं चालत रेटसला आला.

मुंबईच्या दिशेकडे नजर लावून बोटीची इतका वेळ निष्फळपणें वाट पहात बसलेल्या वृद्ध रूबेनसाहेबांच्या मनाची काय स्थिति झाली असेल ती शब्दांनीं वर्णन करून कशी सांगतां येईल? आपल्या चाळिशीचीं भिंगें मळकट खाकी रुमालाच्या टोकानें पुन्हां पुन्हां पुशीत तिच्यामधून ते बुबुळें ताणून ताणून बोट येण्याच्या बाजूकडे एकसारखे पहात बसले होते त्यांनीं आय-झॅकला पोष्टात जाऊन चौकशी करावयास सांगितलें. "बहुधा ते आजच्या बोटीनें येणारच नसतील" असें ते कातर स्वरांत स्वतः-शींच पुटपुटले. पोष्टांत जातांच 'उद्यां सकाळच्या रामदास बोटीनें आम्ही निघत आहोंत, बंदरावर माणूस पाठवा' अशी आदल्या दिवशीं सॅरानें पाठवलेली तार मास्तरनें आयझॅकच्या हातांत दिली. त्या तारेचा चोळामोळा करून आयझॅकनें तो आपल्या विजारीच्या खिशांत कोंबला. आणि तो तडक परत बंदरावर आला. एक वाजायचा सुमार झालेला होता चहूंबाजूंनीं आभाळ पुन्हा भरून आलें आणि पावसाची झड विलक्षण जोरानें परत सुरू झाली. दहापंधरा मिनिटांच्या आंत समुद्राची चर्या पार बदलली. भेसूर आणि चमत्कारिक आवाज काढीत लाटा बेहोषपणें बंद-राच्या दगडी चौथऱ्यावर आदळूं लागल्या. रूबेनसाहेबांना त्या ठिकाणीं बसणेंहि आता अगदीं अशक्य झालें. इतक्यांत आय-झॅक आला. तोंडांतल्या तोंडांत तो म्हणाला, "सॅराची तार आलेली नाहीं. त्या अर्थी आजच्या बोटीनें ते निघालेलेच नाहींत हें उघड आहे. तुम्ही आतां घरीं जा. मी चार वाजेपर्यंत येथें वाट पहात बसतों. तोंपर्यंत बोट आली नाहीं तरी निदान कांहीं

निश्चित बातमी कळेल. ”

नांग्यांत बसून कांडव्याला परत जातांना रूबेनसाहेबांच्या मनाची जी कांहीं स्थिति झाली ती त्यांची त्यांनाच ठाऊक. पावसानें त्यांचे सारे कपडे भिजून चिंब झाले, तरी त्याची त्यांना शुद्ध नव्हती. आयझॅकची आई मज्जुबाई टेबलावर जेवणाची सर्व तयारी करून वाट पहात व्हरांड्यांत उभी होती. रूबेनसाहेब तिच्याशीं कांहींहि बोलले नाहींत. ते व्हरांड्यांतल्या आपल्या नेहमीच्या आरामखुर्चीवर ओल्या कपड्यानिशीं धाडकन् तसेच मागल्यामागें पडले. आणि आपली पाइप न पेटवतांच तोंडांत घालून ती ते ओढूं लागले. सहावाजेपर्यंत आयझॅक परत आला नाहीं. वादळाचा जोर एकसारखा वाढत होता. समुद्राच्या लाटा बेहोष दारूबाजाप्रमाणें झिंगत झिंगत रूबेनसाहेबांच्या बंगल्याच्या पायरीवर येऊन आदळावयाला सुरुवात झाली. समुद्र मर्यादा सोडून आपल्या घराशी एवढी लगट करीत असल्याचें तें चमत्कारिक दृश्य इतक्या वर्षांमध्यें रूबेनसाहेब आज पहिल्यानेंच पहात होते. सहा वाजून पंधरा मिनिटांनीं बंगल्याच्या मागील दारानें आयझॅक गुरासारखा एकदम ओरडत पुढें व्हरांड्यांत आला, “ बाबा, रामदास बोट बुडाली—रामदास बोट बुडाली ! ” तोंडांतली पाईप फेकून देऊन रूबेनसाहेब ताडकन् उठले आणि रुद्ध स्वरामध्यें म्हणाले, ‘ पण सॅरा तर आज मुंबईहून त्या बोटीनें निघाली नव्हती ना ? ’ विजारीमध्यें खरकन् हात घालून एक चुरगळलेला ओला कागद आयझॅकनें बाहेर काढला. आणि तो व्याकुळ स्वरानें ओरडला, “ बाबा, मी तुम्हाला

मघाशीं सांगितलं नाहीं. सॅराची सकाळींच ही तार आली. ती याच बोटीवर होती ! " त्याबरोबर आयझॅकला दोन्ही हातांनीं मिठी मारून रूबेनसाहेबांनीं एवढ्या मोठ्यानें हंबरडा फोडला कीं बंगल्यापुढें येत असलेल्या समुद्राच्या लाटा क्षणमात्र भयानें चपापून उभ्या राहिल्यासारख्या वाटल्या. सॅराच्या स्वागतासाठीं आपल्या अंगावर घातलेले नवे कपडे रूबेन साहेबांनीं टराटर फाडून टाकले. हॉलमध्ये जेवणाच्या टेबलावर अंथरलेली पांढरी चादर एका टोकाला धरून त्यांनीं एकदम वरचेवर उधळून दिली. त्याबरोबर साऱ्या खोलीमध्यें काटे, चमचे, प्याले आणि चिनी मातीच्या बशा खळाळा आवाज करीत एकदम चक्काचूर झाल्या. कोपऱ्यांत ठेवलेला आपला जाड सोटा उचलून त्यांनीं हॉलमध्यें टांगलेल्या ' डिट्मार ' च्या दिव्याचे तुकडे तुकडे करून टाकले. स्वैपाकघरांत जाऊन दिवसभर शिजत असलेल्या मांसाची आणि अन्नाचीं भांडीं त्यांनीं आपल्या बुटाच्या ठोकरीनें उधळून लावलीं आणि " आयझॅक, ताडीचीं चार मडकीं घेऊन ये. " असें सांगून ते व्हरांड्यांत आले आणि अंधारामधल्या आपल्या नेहमींच्या खुर्चीवर त्यांनीं आपलें शरीर फेकून दिलें. दुःखातिरेकानें बेफाम झालेल्या रूबेनसाहेबांना आवरणें आतां मज्जूबाईच्या आणि आयझॅकच्या आवाक्याबाहेर होतें. ताडीचे ग्लास एकामागून एक फस्त करतांना ते मोठमोठ्यानें रडत होते. त्यांचा तो हृदयभेदक शोक ऐकून बंगल्यासमोर आदळणाऱ्या समुद्राच्या लाटाहि आपला पूर्वीचा उन्माद विसरून विव्हळूं लागल्या, आणि घरा-मागल्या उंचउंच माडाच्या झावळ्यांत तोंड लपवून वाराहि पण

दुःखानें स्फूंदूं लागला.

मध्यरात्र उलटली तेव्हां बाहेरच्या वादळाचा जोर कमी झाला. ती आषाढाच्या वद्य पक्षांतील चतुर्दशीची रात्र होती. आकाशात चन्द्र तर कुठें सांदीकोपऱ्यांत लपून बसला होता याचा पत्ताच नव्हता. तरी देखील ढग निवळल्यामुळें थोडासा अंधुक प्रकाश समुद्राच्या पाण्यावर पडल्यासारखा दिसत होता. ताडीची चारीहि मडकीं फस्त करून आणि लाथेच्या ठोकरीनें त्यांचीं खापरें व्हराड्याबाहेर उडवून धडपडत धडपडत रूबेनसाहेब बंगलीच्या पायऱ्या उतरून किनाऱ्यावर आले. आणि मागें हटत चाललेल्या लाटाच्या रोखानें ते चाचपडत चाचपडत अंधारांमधें जाऊं लागले. बंगल्यापासून आता समुद्राचें पाणी पन्नास साठ फूट मागें हटलेलें होतें. समुद्राचें पाणी जसें त्यांच्या पायाला लागलें तसे ते आपोआप थांबले. आणि खाली वांकून अन् ओंजळींत पाणी वर उचलून ते रडत रडत म्हणाले, " माझ्या जिवलग मित्रा, माझ्यापेक्षां तुझ्या अंगाखांद्यावर सॅरा जास्त वाढलेली आहे. तिच्या शरीराला अपाय करण्याची हिंमत तुझ्या या पाण्याला होऊं शकेल काय रे ? " अंधारात समुद्राकडे रूबेन साहेब गेले हें लक्षांत येतांच व्हराड्यांत पेंगत पडलेला आयझॅक हातांत कंदील घेऊन धावत धांवत त्याच्यामागें गेला. समुद्राच्या पाण्यांत ते जीव देत असावेत अशा कल्पनेनें रूबेनसाहेबांचा फाटका शर्ट आयझॅकनें झटकन् एकदम मागें ओढला. तोंच त्याच्या हातांतल्या कंदिलाचा प्रकाश रूबेनसाहेबांच्या पायांपासून दोन हात पुढें पसरलेल्या शुभ्र वस्त्राच्या उंचटशा राशीवर पडला. एक

पाऊल पुढें जाऊन कंदिलाच्या प्रकाशांत आयझॅकनें नीट न्याहा-ळून पाहिलें आणि अंगांत होतें नव्हतें तेवढें बळ एकवटून तो ओरडला, “ बाबा, सॅरा ! ” होय ती सॅराच होती. तिचे सोनेरी केस आणि तांबूस गोरा चेहरा पूर्वी होता तसाच दिसत होता. चिमुकल्या सॉलोमनला दोन्ही हातांनीं आपल्या हृदयाशीं घट्ट धरून ती शांतपणें झोपीं गेल्यासारखी दिसत होती. विशुद्ध वात्सल्याखेरीज तिच्या मुद्रेवर दुसरी कोणतीहि भावना नव्हती. एकादें झाड कोसळून पुढें पडावें तसे रूबेनसाहेब आपल्या गुड-घ्यावर समुद्राच्या पाण्यांत धाडकन् पडले. सॅराला आणि सॉलो-मनला आपल्या उराशी कवटाळून ते त्या अंधारांत ओरडले, “ सॅरा, आलीस, अखेर तूं आलीस, पण ही अशी आलीस ! आयझॅक, ही समुद्राची देणगी नव्हती. हें समुद्राचं देणं होतं. तें तो आज घेऊन गेला. आणि मला त्यानें भिकारी करून सोडलें रे ! ” कोरड्या वाळूवर कंदिल ठेवून आयझॅक रूबेनसाहेबांना दोन्ही हातांनीं आवरायला मागें वळला, तों समुद्राच्या पाण्यांत सॅरा आणि सॉलोमन याच्यासह रूबेनसाहेबांचें शरीर निश्चेष्ट पडलेलें होतें.

दुसरे दिवशीं दुपारीं बंगल्यासमोरच्या आवारांत नारळांच्या झाडाखालीं आयझॅकनें तिघांचें दफन केलें. आणि बंगल्याला कुलूप लावून आपल्या आईसह तो त्याच रात्रीं कांडव्यामधून बाहेर पडला.



# देशमुख आणि कंपनीचीं प्रकाशित पुस्तकें

## वि. स खांडेकर

| | | |
|---|---|---|
| १ | फुलें आणि दगड | ३ |
| २ | घरट्या बाहेर | ३ |
| ३ | पहिली लाट | ३ |
| ४ | सूर्य कमळें | २॥ |
| ५ | चंदेरी स्वप्नें | ४॥ |
| ६ | सायंकाळ | २॥ |
| ७ | अविनाश | १॥ |
| ८ | मंदाकिनी | १॥ |
| ९ | चांदण्यांत | २ |
| १० | कल्पकता | ३ |
| ११ | मराठीचा नाट्यसंसार | ३ |
| १२ | पहिलें प्रेम | ४॥ |
| १३ | दोन मने | ६॥ |
| १४ | जळलेला मोहोर | ३ |

## काकासाहेब कालेलकर

| | | |
|---|---|---|
| १ | ब्रह्मदेशाचा प्रवास | १॥ |
| २ | भक्तिकुसुमें | ३ |
| ३ | सामाजिक प्रश्न | ३ |
| ४ | स्मरण यात्रा | |
| ५ | काकांचा वंदेमातरम् | ४॥ |

## साने गुरुजी

| | | |
|---|---|---|
| १ | पुनर्जन्म | ३ |
| २ | आस्तिक | ३ |
| ३ | संध्या | ५ |
| ४ | गोड निबंध भाग १ | ३ |
| ५ | गोड निबंध भाग २ | ३ |
| ६ | गोड निबंध भाग ३ | ३ |
| ७ | चिंतनिका भाग १ | ६॥ |
| ८ | आपण सारे भाऊ | १। |
| ९ | गोप्या | १ |
| १० | दुर्दैवी | १॥ |
| ११ | मिरी | १॥ |

## ग. त्र्यं. माडखोलकर

| | | |
|---|---|---|
| १ | चंदनवाडी | ६॥ |
| २ | काता | ५ |
| ३ | दोन तपें | ५ |

## ना. धों. ताम्हनकर

| | | |
|---|---|---|
| १ | दाजी भाग १ ला | ४ |
| २ | वडिलांचे सेवेशी | ४॥ |
| ३ | गुजाताई | ६ |
| ४ | बच्चा नवरा | १॥ |
| ५ | दाजी भाग २ | ५ |

## चिं. वि. जोशी

| | | |
|---|---|---|
| १ | आणखी चिमणराव | ४ |
| २ | वायफळाचा मळा | ५ |
| ३ | गुंड्याभाऊ | ४ |
| ४ | लंकावैभव | ४॥ |

## दत्तु बांदेकर

| | | |
|---|---|---|
| १ | सख्या हरी | २ |
| २ | नवी आघाडी | २ |
| ३ | नजरबंदी | २। |
| ४ | अमृतवाणी | ३ |

## प्र. के अत्रे

| | | |
|---|---|---|
| १ | साखरपुडा | २ |
| २ | ललित वाङ्मय | ३॥ |
| ३ | दूर्वा आणि फुलें | २॥ |
| ४ | हास्यकथा | ४॥ |

## अनंत काणेकर

| | | |
|---|---|---|
| १ | पिकली पानें | २ |
| २ | रुपेरी वाळू | १॥ |
| ३ | निशिकांताची नवरी | १॥ |

## ना. ह. आपटे

| | | |
|---|---|---|
| १ | साजणी | ५ |

**रा. वि. फडतरे**



**लक्ष्मणराव सरदेसाई**



**शकुंतलाबाई परांजपे**



**सत्याग्रही**



**वि. म. भुस्कुटे**



**कमलाबाई टिळक**



**रामतनय**



**ह. रा. महाजनी**



**पं. क्षमा राव**



**प्रो. हेरॉल्ड लॉस्की**



**बाबुराव गोखले**



**अरविंद गोखले**



**कोरटकर**



**कॅ. लिमये**



